महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांचे प्रकाशन

# मराठी वाचनमाला

## पुस्तक चौथे




पुणे–१९६८

# प्रस्तावना

मुंबई सरकारने सन १९३९ साली शालेय क्रमिक पुस्तकविषयक प्रश्नांचा विचार करण्याकरिता एक समिती नेमली होती. क्रमिक पुस्तके कोणत्या तत्त्वांवर लिहावी व तयार करावी यासंबंधी काही महत्त्वाच्या सूचना त्या समितीने केल्या होत्या. त्या सूचनांप्रमाणे प्राथमिक शाळेतील इ. १ ते ४ करिता खालील सभासदांच्या समितीने तयार केलेल्या वाचनमालेतील हे ' पुस्तक चौथे ' प्रसिद्ध होत आहे.

**१ श्री. गजानन श्रीपत खैर, अध्यक्ष**
**२ श्रीमती ताराबाई मोडक**
**३ श्री. श्रीधर बाळकृष्ण रानडे**
**४ श्री. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी**
**५ श्री. लक्ष्मण नीलकंठ छापेकर**
**६ श्री. तोताराम पुना अत्तरदे, चिटणीस**

आपले कार्य अत्यंत आस्थेने व विनावेतन केल्याबद्दल विद्याखाते समितीच्या सभासदांचे फार ऋणी आहे. त्याचप्रमाणे ज्या शिक्षकांनी आणि शिक्षणतज्ज्ञांनी या वाचनमालेस मदत केली आहे, त्यांचेही विद्याखाते फार ऋणी आहे.

पुणे :
दि. १-१-१९५०

**दा. चिं. पावटे,**
विद्याधिकारी, विद्याखाते, मुंबई प्रांत.

## सुधारलेली आवृत्ती १९६५

शिक्षक आणि शिक्षणशास्त्रज्ञ यांनी पाठविलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करून वरील समितीने इ. स. १९५७ साली या पुस्तकाची सुधारलेली आवृत्ती तयार केली होती. आता मराठी साहित्य महामंडळाने तयार केलेल्या व महाराष्ट्र राज्य सरकारने मान्य केलेल्या शुद्धलेखनाच्या नियमांनुसार ही सुधारलेली आवृत्ती तयार केली आहे. त्याचप्रमाणे कालमानानुसार आवश्यक असे फेरफारही या आवृत्तीत केले आहेत. दिनांक १६-५-१९६२ पासून श्री. ना. ध. पाटील हे समितीचे चिटणीस म्हणून काम करू लागले आहेत.

पुणे,
दि. १-१-१९६५.
११ पौष १८८६

**चं. धुं. देशपांडे,**
शिक्षण संचालक.
महाराष्ट्र राज्य.

महाराष्ट्र शासनाच्या विद्यमाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ या संस्थेची स्थापना करण्यात आली व या संस्थेकडे पाठ्यपुस्तक निर्मितीचे व अभ्यासक्रम संशोधनाचे कार्य सोपविण्यात आले. या धोरणास अनुसरून प्रस्तुत पुस्तक महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ 'सुरेख', विद्यापीठ मार्ग, पुणे १६, यांनी प्रकाशित केले आहे.

**उत्तम सेवलेकर,**
संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे :
दिनांक : १-१-१९६८

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरेचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडिलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करतो. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यातच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका

- Reading .
- aa : Means .
- Poetry

— Dictation

# १. सूर्योदय

[ सूर्योदयाची वेळ आहे. एक मुलगा आपल्या आईला त्या वेळेची शोभा वर्णन करून सांगत आहे. ]



बघ आई, आकाशात सूर्य हा आला
पांघरून अंगावर भरजरी शेला.
निळ्या याच्या महालाला खांब सोनेरी
मोतियांच्या लावियेल्या आत झालरी.
केशराचे घातले हे सडे भूवरी
त्यावरून येई त्याची डौलाने स्वारी !
डोंगराच्या आडून हा डोकावी हळू
आणि फुले गुलाबाची लागे उधळू !
नभातून सोनियाच्या ओतितो राशी
गुदगुल्या करीत तो खेळे फुलांशी.
पाखरांच्या संगे याची सोबत छान
गाती बघ कशी याला गोड गायन !
मंद वारा जागवितो साऱ्या जगाला
म्हणतसे, 'उठा उठा, मित्र हा आला !'

—शांता शेळके

मित्र ( जगाचा मित्र )—सूर्य.        राशी—ढीग.

## अभ्यास

१. सूर्योदयाचे चित्र काढा. त्यासाठी कोणकोणते रंग वापराल? त्या चित्रात काय काय दाखवाल?
२. सूर्य उगवतो तेव्हा आकाशात कोणकोणते रंग दिसतात? या कवितेत कोणते रंग वर्णिले आहेत?
३. सूर्य काय काय करतो, याबद्दल मुलगा आईला काय सांगतो?
४. सूर्य डोकावून कसा बघतो? तो कळ्यांना, फुलांना गुदगुल्या कशा करतो? तो गुलाबाची फुले कशी उधळतो?
५. पाखरांना सूर्याची सोबत कशी काय मिळते?
६. वारा काय करतो? काय म्हणतो?
७. भरजरी शेला, सोनेरी खांब, केशराचे सडे, सोन्याच्या राशी इत्यादी कशाला उद्देशून म्हटले आहे?

---

# २. घरे व घरटी

एकदा एका अरण्यात पशूंची सभा भरली होती. सुधारलेल्या माणसांप्रमाणे आपण घरे बांधून राहावे असे त्यांना वाटू लागले. उन्हापावसात आपले किती हाल होतात! बायकामुलांना निवाऱ्याची जागा नसते! शिवाय शत्रूपासून रक्षण व्हायला हवे. तेव्हा आपण घरे बांधायला शिकलेच पाहिजे असे त्यांना वाटले. मग त्यांनी ठरविले की, ज्यांना चांगली घरे-घरटी बांधता येतात, अशा पक्ष्यांना व कीटकांना आपल्या सभेस येण्याचे आमंत्रण द्यावे.



आमंत्रण पोचताच सगळी जमा झाली. वनराजाने त्यांचे आभार मानले व आपापली घरे ती कशी बांधतात ते सांगावयास त्यांना विनंती केली.

प्रथम गवळण पुढे झाली. ती म्हणाली, "माझे नाव गवळण. मला

कोणी बाया म्हणतात; कोणी सुगरण म्हणतात. पाहा, मी किती सुबक घरटे विणले आहे. खाली तोंड केलेल्या बाटलीच्या आकाराचे! विहीर, नदी वगैरे पाण्याच्या बाजूच्या झाडावर ते मी टांगून ठेवते. वाऱ्याने हालले, पावसात भिजले तरी मी व माझी पिले त्यात सुखरूप राहतो. ते कशाचे विणले आहे, पाहा तरी नीट. उसाचा पाचोळा, गवत आणि नारळाच्या झावळ्या यांचे तंतू चोचीने सोलून ते विणले आहे. मी आत बाळांसाठी कापसाची गादी पण केली आहे. तशी सुगरणच आहे मी!"



नंतर फुलांतील मध चोखणारा शक्करखोरा आपली लांब बाकदार चोच हालवीत म्हणाला, "माझे घरटे पानांत लपलेले असते. वर वाळलेली पाने चिकटवलेली असतात. पण दार किती खुबीचे असते! पाऊस आत जाऊ नये म्हणून मी त्याच्यावर एक छपरी करतो. शेवरीच्या कापसाने, साध्या कापसाने व लोकरीने मी सगळ्या भिंती मढवितो. किती मऊमऊ आणि ऊबदार घर!"



मग चोचीत एक लांब धागा घेऊन शिंपीण पुढे आली. "माझे नाव शिंपीण. माझे काम कलाकुसरीचे असते. मी घरटे कसे शिवते सांगू? गवताचा नाजूक धागा माझ्या सुईसारख्या चोचीत धरते. एका मोठ्या पानाच्या कडा जुळवून चोचीने भोक पाडून दोरा ओवते. गाठी मारून कडा घट्ट शिवून टाकते. मग मेंढीची लोकर उपटून आणते. ती घरट्यात दाबून बसविली की झाले माझे घर तयार. या छोट्याशा

घरात माझी बाळे राहतात नि मोठी होतात."

लगेच एक मधमाशी गुं गुं करीत म्हणाली, "आमचे पोळे म्हणजे एक गाव आहे. आम्ही हजारो मधमाशा तेथे एकजुटीने राहात असतो. आमच्यात सगळी कामे वाटलेली असतात. कोणी मेण तयार करून पोळे बांधते तर कोणी जंगलात व डोंगरावर फिरून फुलांतला मध व पराग गोळा करून आणते व पोळ्यात साठवते. कोणी पंख फडफडवून मध सुकविण्याचे काम करते. अशा आम्ही रात्रंदिवस खपत असतो. कोणी मध चोरायला आले की, आम्ही त्याच्यावर अशा तुटून पडतो की त्याला सळो की पळो करतो. अशा आम्ही आहोत उद्योगी नि शूर! या की एकदा आमचे गाव पाहायला. आमची सगळी व्यवस्था दाखवू तुम्हांला."



तेवढ्यात जमिनीवरून एक मुंग्यांची रांग चालली होती. त्यांतली एक मुंगी पुढे येऊन म्हणाली, "आम्हीही गावेच बांधतो, पण आमची गावे जमिनी-खाली अगदी भुयारांसारखी सुरक्षित असतात. आम्ही रात्रंदिवस कामे करतो. पाने, अन्न व साखर गोळा करून पावसाळ्याची आमच्या गावात आम्ही बागा सुद्धा करतो. बेगमी करतो.



माणसात आणि आमच्यात काही फरक नाही. आमच्यात राजाराणी आहेत, लढवय्ये शिपाई आहेत; आणि आम्ही सगळे कुशल व उद्योगी कामगार आहोत. अहो, आमच्या वारुळात राणीची खोली आहे, कोठारे आहेत, बाळांसाठी खोल्या आहेत. एकदा मुंगीसारखे लहान होऊन वारुळात येऊन तर बघा. मग खरे वाटेल तुम्हांला."

मुंगी पुन्हा रांगेत शिरून शिस्तीने चालू लागली.

पशूंच्या पुढे प्रश्न पडला. त्यांनी विचार केला की, आपल्याला माणसांसारखे



हात नाहीत आणि पक्ष्यांप्रमाणे चोचीही नाहीत; मुंग्यामाशांचे कसब नाही. मग उगाच खटाटोप कशाला ? आपण आपले पहिल्याप्रमाणे एकएकटे, नाही तर कळप करून राहावे; गवतपाला खावा किंवा शिकार करावी; आणि रात्र झाली की झाडाच्या ढोलीत शिरावे. वेलींच्या जाळ्या असतात, नाही तर डोंगरात गुहा असतात; कोठे तरी आसरा शोधावा झाले.

असा विचार करून पशूंनी घरे बांधण्याचा विचार सोडून दिला.

वनराज—सिंह. बेगमी—साठा, पुरवठा.
सळो की पळो करणे—अतिशय त्रासून सोडणे.

## अभ्यास

१. पशूंनी सभा का बोलाविली ? कोणाची सभा बोलाविली ? सभेत कोणी कोणी भाषण केले ? गवळण काय म्हणाली ? मधमाशीने काय सांगितले ?
२. मधमाशीचे पोळे हे गाव कसे ? मधमाशा शूर व उद्योगी कशा ?
३. मुंग्यांची गावे भुयारांसारखी कशी ? मुंग्या माणसांसारख्या कशा ?
४. पशूंनी शेवटी काय ठरविले ? का ?
५. सुगरण, शक्करखोरा व शिंपीण ही नावे त्या त्या पक्ष्यांना का पडली असावीत ?
६. 'आमचे घर' यावर दहा वाक्ये लिहा.

# ३. मोत्यांचे कणीस

फार वर्षांपूर्वीची गोष्ट. अवंती नगरीत एक राजा राज्य करीत होता. दानशूर म्हणून त्याची प्रसिद्धी होती. राजा दरवर्षी निरनिराळी व्रते धरी व निरनिराळ्या रीतीने दान करी.

या वर्षी राजाने ब्राह्मणांना दानधर्म करण्याचा नेम केला. राजाने ठरविले की, सकाळी ज्या ब्राह्मणाचे तोंड दिसेल त्याला सूपभर मोती द्यायचे. हां हां म्हणता ही बातमी सर्व राज्यात पसरली व गावोगावचे ब्राह्मण येऊ लागले.

अवंती नगरीत यत्नकांत नावाचा एक ब्राह्मण राहात होता. विद्वान, कष्टाळू, प्रामाणिक व राहणीने अगदी साधा. पूजा वगैरे करून तो संसार चालवी. त्याने राजाकडे जायचा कधी विचारच केला नाही.



यत्नकांताच्या बायकोला मात्र वाटे की, त्याने राजाकडे जावे व सूपभर मोती आणावे, म्हणजे आपले दारिद्र्य फिटेल व पोराबाळांची आबाळ होणार नाही. ती यत्नकांतास रोज सांगे, " तुम्ही एकदा राजाकडे जावे. "

अखेरीस पत्नीच्या समाधानासाठी तो जायला तयार झाला. दुसऱ्या दिवशी तिने त्याला लवकर उठवून पहाटेस राजाकडे पाठविले.

राजाने खिडकीचे दार उघडून बाहेर पाहिले. ब्राह्मण दिसताच त्याने सूपभर मोती आणण्यास सेवकास पाठविले व आपण ब्राह्मणास भेटण्यासाठी दाराशी गेला. त्याने ब्राह्मणास चौरंगावर बसविले. त्याचे पाय धुतले. गंधपुष्पांनी त्याचा आदर केला व शेवटी मोत्यांचे सूप पुढे ठेवून नमस्कार केला व म्हणाला, "महाराज, ही भेट घ्यावी."

यत्नकांताने राजाला आशीर्वाद देऊन म्हटले, "तुझ्या राज्यातील प्रजा सदैव सुखी राहो व तुला प्रजेचे आशीर्वाद मिळोत! पण राजा, हे मोती मला नकोत. ते काही तुझे नाहीत. तुझा स्वकष्टाचा पैसा असला तर तो मी घेईन. तू कष्ट करून एक दिवसाची मजुरी मला दिलीस तर मी ती आनंदाने घेईन. हे धन तर लोकांचे. तुझ्या प्रजेचे."

राजा विचारात पडला. आतापर्यंत इतके ब्राह्मण आले व हसत हसत मोती घेऊन गेले. हा ब्राह्मण अगदी निराळा! राजाने ब्राह्मणाचे पाय धरले.

तो म्हणाला, "महाराज, आज मला तुम्ही खरे गुरू भेटलात. तुमचा उपदेश मला पटला. मी कष्ट करीन, पैसा मिळवीन आणि तुमच्या पायांशी अर्पण करीन."

[ २ ]

ब्राह्मणाच्या घरी त्याची पत्नी आतुरतेने वाट पाहात दारातच उभी होती. दुरून पती दिसल्याबरोबर तिने मुलांना हाक मारली. "या रे सगळी. आता बघा काय गंमत होते ती." सगळी बाहेर आली. "बाबा आले, मोती आणले," असे म्हणून ती नाचू लागली.

यत्नकांत हसत हसत घराशी आला.

"हे काय? रिकाम्या हातांनी परत? मोती मागाहून दुजऱ्या घेऊन येतो आहे का?"

"छे! मोती कोणाचे? देणारा कोण आणि घेणारा कोण? मी राजाला सांगितले की मला ते नकोत. हे मोती प्रजेचे आहेत. ते देऊन टाकणारा तू कोण? कष्ट कर, स्वतःच्या कष्टाने धन मिळव आणि मग दान कर. राजाला ते पटले. तो मजुरी करायला निघाला आहे."

बायकोची निराशा झाली. तरी तिला थोडी आशा वाटली. ती मनात म्हणू लागली, "राजाची मजुरी म्हणजे काय पाच-पन्नास पैसे थोडीच असणार! मोत्यांचीच मजुरी मिळणार त्याला." सबंध दिवस ती वाटेकडे डोळे लावून बसली.

राजाने वेष पालटला. गेला शेतावर काम मागायला. एका शेतावर मोट चालली होती. मोटवाल्याला पाणी धरणाराची गरज होती. पाटाचे पाणी कोणत्या वळणांनी शेतात न्यायचे ते मोटवाल्याने त्याला दाखविले. संध्याकाळी सबंध दिवसाची तीस पैसे मजुरी द्यायची बोली केली. राजाला मोकळ्या हवेतले ते काम फार आवडले. हिरवीगार शेते वाऱ्यावर झुलत होती. त्यालाही मोटवाल्याबरोबर गावेसे वाटू लागले.

संध्याकाळी राजाने ब्राह्मणाला बोलावले. आपण स्वत: कष्ट करून मिळवून आणलेले तीस पैसे तो ब्राह्मणाला देऊ लागला.

यत्नकांत म्हणाला, "शाबास राजा. तू मिळविलेले हे तीस पैसे लाख मोलाचे आहेत. पण मी हे सगळे घेणार नाही. तू, तुझी बायको व मुलगा यांच्या एका दिवसाच्या निर्वाहापुरते यांतून काढून घे व मग काही उरले तर मला दे. तेवढेच मी आनंदाने घेईन."

राजाने हिशेब करून आपल्याला लागेल तितके घेऊन ब्राह्मणाच्या हातावर दोन पैसे ठेवले. त्याने ते आनंदाने घेतले व राजाला आशीर्वाद देऊन हसतमुखाने तो घरी आला. बायको दाराशी वाट पहातच उभी होती. तिच्या हातावर त्याने ते दोन पैसे ठेवले.

तिला खूपच आश्चर्य वाटले. तिने विचारले, "हे काय? दोन पैसे कसले?"

यत्नकांताने सगळी हकीकत तिला सांगितली. ती ऐकून तिचा संताप झाला. तिने कपाळावर हात मारून घेतला. तिने ते पैसे रागाने अंगणात भिरकावून दिले. ती मटकन खाली बसली.

"आमचे नशीबच फुटके तिथे राजा तरी काय करणार?"

[ ३ ]

काही दिवसांनी ब्राह्मणाच्या अंगणात त्या दोन पैशांची दोन रोपटी उगवली व भराभर वाढू लागली. दोन महिन्यांत त्यांना कणसे आली. पण पाहातात तो काय नवल! कणसांचे दाणे मोत्यांचे होते. ब्राह्मणाच्या बायकोच्या आश्चर्याला

तर पारच उरला नाही. ती ज्याला त्याला मोत्यांची कणसे दाखवी व त्या दोन पैशांची गोष्ट सांगे.

ब्राह्मणाने एक टपोऱ्या मोत्यांचे कणीस नेऊन राजाला दिले. राजालाही मोठा अचंबा वाटला. तो ती झाडे पाहण्यासाठी यत्नकांताच्या घरी गेला.

यत्नकांत म्हणाला, "राजा, तू दिलेले ते दोन पैसे माझ्या पत्नीने अंगणात फेकले. त्यांचीच ही दोन झाडे."

राजा आश्चर्याने तोंडात बोट घालून झाडांकडे व ब्राह्मणाकडे आळीपाळीने पाहातच राहिला.

यत्नकांत हसून म्हणाला, "राजा, यात आश्चर्य कसले? स्वकष्टाचा महिमा आहे हा. तू दिलेले ते दोन पैसे किती मोलाचे होते ते ही झाडे दाखवीत आहेत! पटले ना?"

"खरे आहे महाराज, आजपासून स्वतः श्रम करूनच मी पैसा मिळवीन व बायकामुलांचे पोट भरीन. रयतेच्या पैशावर चैन करणार नाहीं."

"राजा, तुला शतशः आशीर्वाद आहेत. तू वागशील तशी तुझी प्रजा वागेल. तू सुखी होशील आणि सारी प्रजा सुखी होईल. देव तुझे कल्याण करो!"

दानशूर—दान देण्यात शूर, उदार. दानधर्म—परोपकारासाठी केलेला द्रव्याचा खर्च. निर्वाहापुरते—पोट भरण्यापुरते. अचंबा—आश्चर्य. शतशः—शेकडो (शत–शंभर). महिमा—मोठेपणा.

## अभ्यास

१. राजाने कोणते व्रत धरले होते? त्याने यत्नकांत ब्राह्मणाला काय देऊ केले? व ते त्याने का नाकारले? राजाने नंतर काय केले? त्याने यत्नकांतास काय दिले? त्याच्या बायकोला काय वाटले? मोत्यांचे कणीस कसे तयार झाले?

२. वाक्यांत उपयोग करा :—
आबाळ होणे, कपाळावर हात मारणे, तोंडात बोट घालणे.

३. या गोष्टीस आणखी दुसरी कोणती नावे तुम्ही द्याल?

४. या गोष्टीचा संवाद करून दाखवा.

---

## ४. या बालांनो

[ एक पुंगीवाला जादूगार एका नगरातील मुलांना दुसऱ्या अद्‌भुत सृष्टीत बोलावीत आहे. ]

या बालांनो, या रे या
लवकर भरभर सारे या !
मजा करा रे ! मजा मजा !
आज दिवस तुमचा समजा.
स्वस्थ बसे
तोचि फसे
(नवभूमी)
दाविन मी,
या नगराला लागुनिया
सुंदर ती दुसरी दुनिया
या बालांनो, या रे या
लवकर भरभर सारे या ! १

खळखळ मंजुळ गाति झरे
गीत मधुर चहुबाजु भरे;
जिकडे तिकडे फुले फळे
सुवास पसरे, रसहि गळे
पर ज्यांचे
सोन्याचे
ते रावे
हेरावे
तर मग कामे टाकुनिया
नवी बघा, या, ही दुनिया !

या बाळांनो, या रे या
लवकर भरभर सारे या ! २

पंख पाचुचे मोरांना
टिपति पाखरे मोत्यांना,
पंख फडकती घोड्यांना
मौज दिसे ही थोड्यांना
चपलगती
हरिण किती !
देखावे
देखावे
तर मग लवकर धावुनिया
नवी बघा, या ही दुनिया !
या बाळांनो, या रे या
लवकर भरभर सारे या ! ३

—भा. रा तांबे

पर—पंख. रावे—पोपट. हेरावे—पाहावे. नव—नवीन.
चपलगती—वेगाने धावणारे.

## अभ्यास

१. पुंगीवाला मुलांना कोठे जावयास सांगत आहे ?
२. नव्या दुनियेत मुलांना कोणकोणते देखावे पाहावयास मिळतील ?
३. पोपट, मोर व घोडे यांचे कोणते विशेष वर्णन केले आहे ?
४. तुम्ही आणखी काही अशाच मजेदार कल्पना सांगा.

# ५. टोपीची कहाणी

आटपाट नगर होते. तेथली माणसे सारी उघडी. त्यांना वाजायची फार थंडी. देवाला आली दया. त्याला वाटले, झाकावी यांची काया. त्यांना देवाने दिली बी आणि सांगितली खुबी. बी होती बारकी. तिचे नाव सरकी.

लोकांना आनंद झाला. शेतकरी शेतावर गेला. शेत होते काळे काळे. शेतकऱ्याने फोडली ढेकळे. पावसाळा सुरू झाला.

झडीचा पाऊस कमी झाला. शेतकऱ्याने पेरा केला. सरकी रुजली. काही दिवसांनी रोपे डुलू लागली. नाजूक भारी कपास राणी. बेताचे हवे पाऊसपाणी.

कपाशीच्या पुष्कळ जाती झाल्या. काही लहान तर काही उंच. देवांची देवकपाशी, वाढली वीस फूट खाशी. सगळ्यांना पुष्कळ फांद्या फुटल्या. त्या पानांनी भरून गेल्या. पानांचा आकार फार छान. जसे काही एरंडीचेच लहान पान.

तीन महिने लोटले. कपाशीला आली फुले. फुलांचा रंग वेगळा वेगळा; पांढरा, तांबडा आणि पिवळा. फुलांपासून बोंडे बनली. बोंडांत सरकी निपजली. सरकीचे अंग सारे भरले. पांढऱ्या तंतूंनी वेढून टाकले. बोंड वाढले. उन्हाने तडकले. कापूस दिसू लागला.

पावसाळा संपून गेला. आता कापूस वेचणीचा हंगाम आला. बायका मुले पहाटेसच उठत. कापूस वेचून घरी आणीत. दहिवर असते सकाळी. कापसापासून पाने असतात मोकळी. म्हणून वेचणीस जावे त्याच वेळी. वेचणीस लागले महिने दोन. वेचण्या झाल्या तीन. कोठे झाल्या चार. मग कापसाने पाहिला बाजार. ज्याचा धागा लांब निपजला, जास्त भाव त्या कापसाला. त्याची तलम वस्त्रे होतात, म्हणून लोक भारी किंमत देतात.

कापूस कारखान्यात गेला. कापडाचे रूप घेऊन बाहेर आला. कापड बाजारात आले, तसेच सूतही आले. कोष्टयांनी सूत विकत घेतले. त्याचा ताणा काढला. ताण्याची पांजणी केली. पांजणी सांधली आपल्या औतास. औत घातले मागावर आणि कापड काढले सुंदर. शिंप्याने केले तुकडे. शिवले भराभर कपडे.





शिवाभिवांनी काय केले ? कापसाचे पीक काढले. थोडा कापूस बाजारात पाठविला. थोडा घरीच ठेवला. उन्हाळ्यात शेतकामाची नव्हती घाई. त्यांनी सुरू केली कताई. कापूस घेतला समोर. कचरा काढला भराभर. धनुकली लावली कापसाला. पिंजून पिंजून मोकळा केला. फळी सळी घेऊन छान पेळू बनविले.



मग चरखा घेऊन ते सूत काढू लागले. सूत काढून बनविली खादी. खादीची शुभ्र टोपी बनली. कहाणी तिची संपली.



महात्माजींचा वसा, शिवाभिवांनी ऐकला खासा. आळस त्यांनी टाकला. वेळेचा उपयोग केला. उद्योगाची धरू कास. मग संपत्तीची पडेल रास. शिवाभिवा सुखी झाले. तसे तुम्हीआम्ही होऊ. ही साठा उत्तरांची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण.

काया—शरीर. वसा—व्रत, नियम. औत—ताणा सांधण्यासाठी वईफणी तयार करण्याचे साधन. पांजण—ताण्यास खळ लावण्याची क्रिया.

## अभ्यास

१. टोपी कसकशी तयार होत जाते ? प्रत्येक वेळेचे तिचे वर्णन करा.

२. टोपीप्रमाणेच आणखी कोणाकोणाची अशीच कहाणी सांगता येईल ? कशी ?

३. दया-काया, बी-खुबी, बारकी-सरकी अशा मजेदार जोड्या या धड्यात खूप आल्या आहेत. त्या शोधून काढा. कहाण्यांमध्ये मोठी मजेची रचना असते. दुसऱ्या कहाण्या वाचा.

४. प्रत्येकावर पाच वाक्ये लिहा :—
कापसाच्या पेरणीच्या वेळेचे शेत. कापूसवेचणी सुरू असतानाचे शेत. माझा चरखा. आमच्या शाळेतील विणकाम.

---

# ६. महर्षी धोंडो केशव कर्वे

ऋषी-महर्षींच्या पुष्कळ कथा आपण पुराणांत वाचतो. त्या फार पूर्वीच्या काळातल्या ऋषींच्या व त्यांच्या आश्रमांच्या गोष्टी आहेत. तसेच महर्षी व आश्रम आताही आपल्याला प्रत्यक्ष पाहावयास मिळतात. श्री. धोंडो केशव कर्वे हे असेच महर्षी होते. त्यांना सर्व अण्णा म्हणत. त्यांचा जन्म कोकणात १८५८ साली झाला. त्यांच्या बाळपणची हकीकत मोठी वाचण्यासारखी आहे.



जुन्या काळच्या पुष्कळशा मंडळींना शिक्षण घेण्यास खूप अडचणी येत. पैशाची अडचण तर बहुतेकांना असेच; पण इतरही अडचणी पुष्कळच असत. कर्वे सहाव्या इयत्तेची परीक्षा देण्यास साताऱ्यास गेले, तेव्हां त्यांना किती त्रास पडला ! पावसामुळे मुंबई—रत्नागिरीचे रस्तेही बंद ! मग अठरा कोस चालून चिपळूणला जावे व तेथून आणखी अठरा कोस साताऱ्यास जावे, असा त्यांनी विचार केला. पाठीशी ओझी बांधून कर्वे व त्यांचे चार मित्र पायी निघाले. खूप थकून भागून ते दोन दिवसांनी चिपळूणला पोचले. चिपळूणला त्यांना लोकांनी सांगितले की, मोठ्या रस्त्याने सातारा अठरा कोस पडेल, पण मधल्या रस्त्याने बाराच कोस होईल. त्यांनी सामानासाठी एक

घोडे केले व ते जवळच्या वाटेने चालावयास लागले.

श्री. कर्वे आपल्या स्वतःच्या चरित्रात लिहितात, "आम्हांला परीक्षेचा ध्यास लागला होता. त्यामुळे आमची शरीरे थकली होती तरी आमची मने त्यांना जोर देऊन ओढओढून नेत होती. तशी ओढ त्या बिचाऱ्या घोड्यास काय होती ! अर्ध्या खिंडीत काळोख पडला. एका बाजूला उंच कडा, दुसऱ्या बाजूला खोल दरी आणि मध्ये दोन तीन हातांची अरुंद वाट, व जिकडे तिकडे किर्र झाडी !" अशा कठीण वाटेने ते चालले होते. मध्येच घोडे चालेना. काठी मारल्यावर तर ते तेथेच मटकन बसले !

अशा अनेक अडचणींतून हे पंधरा सोळा वर्षांचे मुलगे साताऱ्यास परीक्षेच्या दिवशी संध्याकाळी पोहोचले. एवढे बरे झाले की, तो दिवस नावे नोंदविण्यात गेल्यामुळे परीक्षेस सुरुवात झाली नव्हती. तेव्हा हे सर्व मुलगे उत्साहाने दुसऱ्या दिवशी परीक्षेस गेले. पण काय ? परीक्षकांनी कर्व्यांना सांगितले की, "तू लहान आहेस. तुला नाही परीक्षेस बसता येणार." हे ऐकून कर्व्यांना काय वाटले असेल ! त्यांचे मन किती खट्टू झाले असेल ! त्यांना वाईट तर वाटलेच; परंतु अडचणीमुळे निराश होऊन बसणे हे त्यांच्या स्वभावातच नाही. त्यामुळे दुसऱ्या वर्षी त्यांनी कोल्हापूरला असेच चालत जाऊन परीक्षा दिली. त्यांच्या पुढील आयुष्यात त्यांनी जी मोठाली कामे केली त्यांत त्यांचा हाच स्वभाव दिसून येतो. याप्रमाणे अनेक अडचणींना तोंड देऊन त्यांनी आपले शिक्षण पुरे केले आणि ते कॉलेजात प्राध्यापक झाले.

महर्षी कर्व्यांनी स्त्रीशिक्षणाचे फार मोठे कार्य हाती घेतले व पार पाडले. साठ वर्षांपूर्वीचा काळ फार निराळा होता. आता हजारांनी मुले शाळेत व कॉलेजात जाताना दिसतात. मुलांच्या बरोबरीने मुली शिकत आहेत व कामेही करीत आहेत. परंतु त्या काळात तसे नव्हते. मुलींना शिकवीत नसत आणि बालविधवांचे तर फार हाल होत.

अण्णांना त्यांचे हाल पाहावेनात. त्यांचा जीव तीळ तीळ तुटू लागला. यांच्याकरिता आपण काहीतरी केलेच पाहिजे, अशी त्यांना तळमळ लागली. त्यांनी विचार केला की, विधवांना राहण्यासाठी एक आश्रम हवा. त्यांनी 'अनाथ बालिकाश्रम' स्थापन केला. पुण्यापासून सहा मैलांवर हिंगणे येथे एक लहानशी झोपडी बांधून तिच्यात या आश्रमास सुरुवात झाली. पहिल्यांदा सात मुलींनी

सुरुवात झाली. पण लवकरच साताचे सत्तर, सत्तराचे सातशे याप्रमाणे संख्या वाढत गेली. आता तर कॉलेजची भव्य इमारत एरंडवण्यास झाली आहे व मुंबईत तर त्यांच्या विद्यापीठाची मोठी इमारत व तिला जोडून कॉलेजे झाली आहेत. या विद्यापीठाच्या शाखा सबंध हिंदुस्थानात पसरल्या आहेत. हिंगण्याची ती लहान झोपडी अद्याप पाहायला मिळते.

हे सर्व कार्य करण्यास अण्णांना कितीतरी स्त्री व पुरुष कार्यकर्ते मिळाले व त्यामुळे अनेक हातांनी विस्तार झाला हे खरे. पण मुख्य चालना ही अण्णांचीच.

एवढ्या मोठ्या कार्याला पैसाही पुष्कळ लागतो. अण्णांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी लाखो रुपये त्यासाठी गोळा केले. पण दान मिळविण्यात अण्णांची रीत अशी की, प्रथम स्वतः आपल्याजवळ असेल ते देऊन टाकावयाचे. अनाथ बालिकाश्रमास त्यांच्या स्वतःच्या एक हजार रुपयांनी सुरुवात झाली. त्यांचे पहिले दान त्यांनी आपल्या विद्यार्थी अवस्थेतच दिले. आपल्या लहानशा स्कॉलरशिपमधून ते रुपयास एक पैसा धर्मादायासाठी काढून ठेवीत. त्यातूनच त्यांनी आपल्या खाणावळीच्या मालकास तो आजारी पडला असता मदत केली.

त्यांचे म्हणणे आहे की, दान श्रीमंतच देऊ शकतात असे नाही. प्रत्येकाला दान करता येते. एकाजवळून एक हजार घेण्यापेक्षा एक हजारांकडून एक एक रुपया घेणे अधिक चांगले. कारण यात हजारांची सहानुभूती मिळते.

गंगा नदी जशी गंगोत्रीजवळ थेंबाथेंबाने वाहणारी लहान असते, पण पुढे महान नदी होते, तसेच अण्णांच्या कार्याचे झाले आहे. कोठे एक छोट्याशा झोपडीत साठ वर्षापूर्वी सुरू झालेला लहानसा आश्रम आणि कोठे आज सबंध देशात पसरलेले त्यांचे प्रचंड कार्य !

याप्रमाणे त्यांनी अखेरपर्यंतचे सर्व आयुष्य देशाच्या सेवेत अत्यंत कष्ट सोसून घालविले. हेच त्यांचे तप व म्हणूनच ते महर्षी. या महर्षींचा १९५८ साली भारत सरकारने ‘ भारतरत्न ’ अशी बहुमानाची पदवी देऊन गौरव केला. या थोर महर्षींना आपले वंदन असो.

खट्टू होणे--नाराज होणे.  धर्मादाय--धर्मकार्यासाठी दिलेले दान.
गंगोत्री--गंगा नदीच्या उगमाचे ठिकाण.  दीर्घायुषी--खूप आयुष्य लाभलेले.

### अभ्यास

१. महर्षी कर्व्यांना शिक्षण घेताना कोणत्या अडचणी आल्या ?
२. सहावीच्या परीक्षेच्या वेळी त्यांना खट्टू का व्हावे लागले ?
३. कर्व्यांनी शिक्षण घेतल्यावर कोणते कार्य हाती घेतले ? ते का ?
४. कर्व्यांनी आपल्या कार्यास आरंभ कोठे व कसा केला ? त्याचा विस्तार कसा झाला ?
५. आपल्या कार्यासाठी दान मिळविण्याची त्यांची रीत कोणती ? त्याविषयी त्यांचे काय म्हणणे आहे ?
६. कर्व्यांना 'महर्षी' का म्हणतात ?

---

## ७. झुळुक मी व्हावे

[ वाऱ्याची झुळुक तुम्हांला माहीत आहेच. ती काय काय करते व कशी लबाड आहे, हे या कवितेत पाहा. ]

वाटते सानुली मंद झुळुक मी व्हावे
घेईल ओढ मन तिकडे स्वैर झुकावे.
कधि बाजारी तर कधी नदीच्या काठी
राईत कधी वा पडक्या वाड्यापाठी.
हळु थबकत जावे कधि कानोसा घेत
कधि रमत गमत वा कधी भरारी थेट.
लावून अंगुली कलिकेला हळुवार
ती फुलुनि बघे तो व्हावे पार पसार.
परि जाता जाता सुगंध संगे न्यावा
तो दिशादिशांतुनि फिरता उधळुनि द्यावा.
गाण्याची चुकलीमुकली गोड लकेर
झुळझुळ झऱ्याची पसरावी चौफेर.
शेतात पाचुच्या, निळ्या नदीवर शांत
खुलवीत मखमली तरंग जावे गात.

वेळूच्या कुंजी वाजवुनी अलगूज
कणसांच्या कानी सांगावे हितगूज.
शिंपावी डोही फुले बकुळिची सारी
गाळुनी जांभळे पिकली मुळमुळ तीरी.
दिनभरी राबुनी दमला दिसता कोणी
टवटवी मुखावर आणावी बिलगोनी.
स्वच्छंद अशा या करुनी नाना मौजा
घ्यावया विसावा यावे मी तिनिसांजा.

— दा. अ. कारे

सानुली—लहानशी. स्वैर—आपल्या इच्छेप्रमाणे. पाचू—हिरवे रत्न. वेळूचे कुंज—वेळूचे बेट. स्वच्छंद—आपल्या लहरीप्रमाणे. हितगूज—हिताची गोष्ट.

## अभ्यास

१. कवीला काय व्हावेसे वाटले ? वाऱ्याची झुळूक कोठे कोठे जाणार आहे ? प्रत्येक ठिकाणी कोणकोणते काम करणार आहे ? सर्व ठिकाणी जाऊन आल्यावर मग कवी परत कोठे येणार आहे ? केव्हा ?

२. झुळूक होऊन कवी जी कामे करणार आहे, त्यामुळे कोणाकोणाचा फायदा होणार आहे ? कोणता ? या कवितेवरून वाऱ्याच्या झुळुकेचा कोणता स्वभाव दिसून आला ? कशावरून ?

३. झुकणे, कानोसा घेणे, पसार होणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

---

## ८. मर्दानी झाशीवाली

२३ मार्च १८५८ ! सुमारे शंभर वर्षे होऊन गेली. त्या दिवशी झाशीच्या किल्ल्यांत २०–२१ वर्षांची एक तरुण स्त्री सेनापतीचे काम करीत होती !

पायजमा पायी शुभ्र
गहिरा अंगरखा अंगी
कमरेस दुपेटा भारी
समशेर लटकली जंगी
शोभली शिरी चंदेरी
सुंदर बत्ती नारिंगी.



अशा मर्दानी वेषात ती शूर स्त्री मध्यरात्री तटावर हिंडत होती. तिच्या सैन्यात स्त्रिया सुद्धा होत्या. त्या दारूगोळा वाहून नेण्याचे काम करीत होत्या. सगळी तयारी झाली आणि राणीने हुकूम दिल्याबरोबर—

'धुडुम—धाड—धाड' अशी गर्जना करीत 'घनगर्ज' नावाची प्रसिद्ध तोफ सुरू झाली.

झाशीचे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. झाशीच्या राणीचा—लक्ष्मीबाईचा हुकूम सुटला !

इंग्रजांचे सैन्य शहरात घुसले होते. त्यांनी शहराचा नाश केला आणि झाशीच्या किल्ल्यावर धडक मारली ! लक्ष्मीबाई मोठ्या धैर्याने किल्ला लढवू लागली.

बुरुजाबुरुजावर मोर्चे
बांधोनिया तोफांचे
सजविले सैन्य शूरांचे
आपणही वेषे सजली, मर्दानी झाशीवाली.

ते पाहून इंग्रज सेनापती सुद्धा म्हणाला, 'मर्दानी झाशीवाली !' घनगर्ज तोफ ढगांच्या गडगडाटासारखी गर्जना करीत गोळे सोडू लागली. इंग्रजांच्या फौजेत धावपळ सुरू झाली.

झाशीचा वेढा उठण्याचा रंग दिसू लागला. परंतु इतक्यात फितुरीची ठिणगी उडाली. दारूचे कोठार पेटले. शहर आगीने भाजून निघाले. राणीची प्रजा आक्रोश करू लागली. तरी राणीने धीर सोडला नाही. राणीने शत्रूकडे तोफेचे तोंड वळविले आणि एक इंग्रज सेनापती ठार झाला. झाशीवाले शिपाई दुप्पट आवेशाने लढू लागले.

**पडघम बिगुलांच्या नादी शिंगे कर्ण्यांचे नाद**
**खाली वरती भरलेला संग्रामाचा उन्माद.**

अशा वीरश्रीने वातावरण भरून गेले. पण शेवटी किल्ल्याची दक्षिण बाजू ढासळली ! तरी राणीने धीर सोडला नाही. सात दिवस ती आपल्या शिपायांना धीर देत स्वतः लढत होती. सातव्या दिवशी डाव्या तटाला खिंडार पडले !

राणीने रातोरात ते बुजविले, परंतु इंग्रजांच्या दुर्बिणीने शेवटी घात केला. किल्ल्यातले पाण्याचे तळे त्यांना दिसले. तेथे अचूक गोळा आला. तळे फुटले. किल्ल्यातले पाणीच तुटण्याचा प्रसंग आला. तरी लक्ष्मीबाईने धीर सोडला नाही. ती झाशीच्या स्वातंत्र्यासाठी लढतच राहिली ! परंतु शेवटी दक्षिण बुरुजाला खिंडार पडले. ते मात्र दगडाविटांनी बुजण्यासारखे नव्हते. ते फितुरी लोकांनी पाडलेले खिंडार होते. फितुरांनी मदत केल्याने इंग्रजांना वाट मिळाली. किल्ल्याला आठ ठिकाणी शिड्या लागल्या. इंग्रज सैन्य भराभर चढू लागले.

राणीला हे कळले. क्षणभर तिचा धीर खचला. पायाखालची जमीन हादरत आहे असे तिला वाटले. तिचे डोळे लाल झाले. अंग थरथरू लागले. तरवारीची मूठ जास्तच आवळ झाली. चवताळलेल्या बेभान वाघिणीसारखी ती त्या बाजूस धावत गेली ! अकराव्या दिवशी इंग्रजांचा गोळा थेट किल्ल्यातील राजवाड्यावरच पडला ! शेवटी तिला कळून चुकले की, आपल्याच लोकांनी किल्ल्याखाली सुरुंग लाविले आहेत. लढाईचा शेवट तिला कळून चुकला. जळती झाशी तिला बघवेना ! एका म्हाताऱ्या सरदाराने तिला धीर दिला आणि रात्री किल्ल्यातून निसटण्याची युक्ती सुचविली. राणीने पुन्हा निश्चय केला की, ' मेरी झाशी नही दूंगी ! '

मध्यरात्र झाली. राणीने निघण्याची तयारी केली. दामोदर नावाचा तिचा दत्तक मुलगा होता. तो लहान होता. त्याला तिने पाठीशी बांधले आणि—



**अस्मानफेक जातीच्या**
**वेगी चढत्या छातीच्या**
**तुरगी चढली त्वेषाच्या**
**सरसावुन मागे थोडा, फेकला तटाहुनि घोडा !**

शत्रूच्या पहाऱ्यातून ती मोठ्या शिताफीने निसटली. पण लवकरच बातमी फुटली. राणीचा पाठलाग सुरू झाला. राणीने वीस तास सारखी दौड करून आपल्या साथीदारांच्या सैन्याची छावणी गाठली ! तिचे हे अचाट शौर्य पाहून शत्रूही थक्क झाले !

किल्ल्याचा वेढा फोडून राणीने आपल्या साथीदारांना गाठले आणि लवकरच ती रणांगणात उतरली. झाशीची सुटका करण्यासाठी ती लढतालढताच मरण पावली ! मर्दानी झाशीवाली मरेपर्यंत गर्जून सांगत होती—

" मेरी झाशी नही दूंगी ! "

संग्राम—युद्ध. पायजमा—विजार, तुमान. गहिरा—गर्द रंगाचा. दुपेटा—दुहेरी गुंडाळलेला शेला. बत्ती—एक प्रकारची पगडी, शिरस्त्राण. तुरग—घोडा. उन्माद—जोर. सजणे—तयार होणे. फितुरीची ठिणगी पडणे—गुप्तपणे शत्रुपक्षास बातमी मिळणे. थक्क होणे—आश्चर्यचकित होणे. पायाखालची जमीन हादरणे—नाश होण्याची वेळ आली आहे, असे वाटणे.

## अभ्यास

१. झाशीवर कोणी स्वारी केली ? या स्वारीला कोणी तोंड दिले ? कोणत्या प्रकारे ? किल्ला लढविताना कोणती संकटे आली ? त्या संकटांतून पार पडण्यासाठी राणीला काय काय करावे लागले ?

२. राणीचा धीर केव्हा खचला ? का ? राणीच्या शौर्याचे वर्णन करणारी वाक्ये निवडा. तिला मर्दानी का म्हटले आहे ? राणीच्या तोंडचे कोणते शब्द धड्यात दिले आहेत ? ते वाचून तुम्हांस राणीबद्दल काय वाटते ? तुम्हांला काय करावेसे वाटेल ?

३. मोर्चा बांधणे, फितुरीची ठिणगी पडणे, थक्क होणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

४. श्री. तिवारी यांची ' फेकला तटाहुन घोडा ' ही कविता मिळवा व पाठ करा.

---

# ९. पाऊस

[ पावसात खेळणे तुम्हांला आवडते. झिम झिम पाऊस पडत असताना काय काय मौज दिसते, हे या कवितेत सांगितले आहे. ]



पाउस आला सवंगड्यांनो,
जलधारा पडती
झिम् झिम् जलधारा पडती.

दर्यावरची लुटून दौलत
ढग डौलाने जाती डोलत,
फुटून खजिना वाटेवरती ओघळले मोती
झिम् झिम् जलधारा पडती.

गवताची तरतरीत पाती
पहा ओणवी होउन न्हाती,
आणि वाहता वारा बघती थरथरून वरती
झिम् झिम् जलधारा पडती.

कौलाराच्या आड सानुल्या
चिमणाताई दडून बसल्या,
डोळे मिटुनी ध्यान कुणाचे वळचणीत करती
झिम् झिम् जलधारा पडती.

बाग बघा हा बहरुन गेला
पानोपानी नवा तजेला,
लेऊन बसला हिरवा शेला जणु अंगावरती
झिम् झिम् जलधारा पडती.

गुलाबकलिका गोजिरवाणी
सर्व फुलांची ही तर राणी,
घेता अंगावरती पाणी कशी फुले बघ ती
झिम् झिम् जलधारा पडती.

हासू खेळू नाचू या रे,
भिजू पावसामध्ये सारे,
फुलांप्रमाणे झेलुन घेऊ जलबिंदू हाती
झिम् झिम् जलधारा पडती.

पाउस पडता पण कोसळुनी
कडाडता ढग जाऊ पळुनी,
पंख झाडुनी जशी पाखरे घराकडे उडती
झिम् झिम् जलधारा पडती.

— कुसुमाग्रज

दर्या—समुद्र. गोजिरवाणी—लहानशी व सुंदर. तजेला—टवटवी.

## अभ्यास

१. पाऊस कोण आणतात ? कोठून ?
२. पाऊस पडायला लागला की गवत, बाग, चिमणी, फुलांच्या कळ्या, यांच्यात काय काय बदल होतो ?
३. मुलांना या वेळी काय वाटते ? ती पावसातून केव्हा पळून जातील ? का ? कोणासारखी ?
४. जलधारांना कवी काय म्हणतो ? चिमणी कोठे बसली होती ? का ? गुलाबकलिकेला कवी काय म्हणतो ? का ?
५. पावसासंबंधीची अशीच एखादी कविता मिळवा व ती पाठ करा.
६. ' पावसात फिरण्याची मौज ' यावर दहा वाक्ये लिहा.

---

# १०. आपला देश

छोटी मंगला शाळेतून आली ती धावत धावतच माडीवर गेली. बाबा आपल्या खोलीत भिंतीवरल्या हिंदुस्थानच्या मोठ्या नकाशात काहीतरी शोधीत उभे होते. एक कोरे करकरीत पुस्तक होते त्यांच्या हातात. मंगलेने वाकून त्याचे नाव वाचले, ' उद्याचा भारत.'

पण बाबांनी काही मागे वळून पाहिले नाही. त्यांची गंमत करावी असे मंगलेच्या मनात आले. ती डोळे मिटून उभी राहिली. तिने आपले चिमुकले हात जोडले. गंभीर स्वराने ती म्हणू लागली,

" वंदे मातरम्, सुजलाम् सुफलाम्—"

बाबा चमकले. हसत हसत वळून ते म्हणाले, " अग लबाडे ! "

बाबांच्याकडे उत्सुकतेने पाहात मंगलेने विचारले, " आपल्या देशाला ' भारत ' का हो म्हणतात बाबा ? "

बाबा म्हणाले, " फार पूर्वी भरत नावाचा एक मोठा पराक्रमी राजा आपल्या देशात होऊन गेला."

इतक्यात मंगलेची वडील बहीण विद्या आत आली, आणि घाईघाईने म्हणाली, " लहानपणी सिंहाचा जबडा उघडून त्याचे दात मोजीत असे तो ! "

तिची पाठ थोपटीत बाबा म्हणाले, " या भरतासारखे किती तरी पराक्रमी

स्त्रीपुरुष आपल्या देशात झाले आहेत. राम आणि कृष्ण. त्यांनी मोठमोठे दुष्ट राक्षस मारले. चंद्रगुप्त, प्रताप, शिवाजी हे आपल्या देशासाठी लढले."

विद्या म्हणाली, "बायका सुद्धा लढायला जात होत्या तेव्हा. चांदबिबी, अहिल्याबाई, तटावरून घोडा उडवून इंग्रजांच्या हातून निसटून गेलेली झाशीची लक्ष्मीबाई—"

भिंतीवरल्या एकेका फोटोकडे पाहात मंगला बोलू लागली, "आणि टिळक, गांधीजी, सुभाषबाबू, नेहरू हे सुद्धा आपल्या देशासाठी लढले आहेत."

विद्या म्हणाली, "नेहरूंनी जपानी मुलांसाठी एक लहानसा हत्ती देखील पाठविला होता!"

गांधीजींच्या फोटोकडे पाहात बाबा उद्गारले, "महात्माजींना सुद्धा मुले फार आवडत. माणसाने माणसावर प्रेम करणे हा जगातला सर्वात मोठा धर्म आहे, असे गांधी मानीत. तो मुलांमध्ये आढळतो म्हणून—"

विद्या मध्येच म्हणाली, "बुद्धाच्या चरित्रात सुद्धा तेच आहे. गुरू नानक यांनीही लोकांना हेच शिकविले."

बाबा आनंदून म्हणाले, "आपल्या या प्राचीन विशाल देशात असे किती तरी महात्मे होऊन गेले आहेत. महावीर, ज्ञानेश्वर, कबीर, एकनाथ—"

मंगला टाळ्या पिटीत म्हणाली, "एकनाथ! मला माहीत आहे ती गोष्ट. महाराच्या मुलीला मांडीवर घेऊन त्यांनी पाणी पाजले होते तिला! होय ना?"

कोपऱ्यातल्या एका फोटोकडे बोट दाखवीत मंगला म्हणाली, "हेच ते कर्वे. आपल्या घरी मागे आले होते." लगेच दुसऱ्या फोटोकडे वळून तिने विचारले, "हे दुसरे कर्वे कोण हो बाबा? यांना सुद्धा दाढी आहे की!"

बाबा हसत हसत म्हणाले, "हे रवींद्रनाथ ठाकूर. यांच्यासारखे मोठमोठे कवी आणि लेखक आपल्या देशात पुष्कळ होऊन गेले आहेत. रामायण लिहिणारा वाल्मिकी, महाभारत रचणारा व्यास, कालिदास, तुकाराम, तुळशीदास, हरिभाऊ आपटे—"

बाबा बोलता बोलता थांबले असे पाहून विद्या नकाशापाशी गेली आणि टक लावून त्याकडे पाहात म्हणाली, "बाबा, आमच्या बाई नेहमी म्हणतात, हिमालयाएवढा उंच पर्वत जगात नाही. गंगा, यमुना, कृष्णा, कावेरी यांच्यासारख्या नद्या दुसरीकडे कोठे नाहीत. आपल्या देशात सारी धान्ये, सारी फळे

पिकतात. मग मंगलेएवढी भिकाऱ्यांची लहान लहान मुले रस्त्यावर टाकलेल्या उष्ट्या खरकट्यातली शिते का हो वेचीत बसतात ? त्यांच्या अंगावर किती फाटके आणि मळके कपडे असतात ! त्यांच्याकडे पाहिले कीं, इतके वाईट वाटते—"

विद्येच्या डोळ्यात पाणी तरारले होते. तिला जवळ घेऊन तिच्या पाठीवरून हात फिरवीत बाबा म्हणाले, " बाळ, अशी अनेक दुःखे आज आपल्या देशात आहेत, हे खरे ! पण इतके दिवस आपण स्वतंत्र नव्हतो. त्यामुळे ती आपणाला दूर करता आली नाहीत. आता आपण सर्वांनी कामाला लागले पाहिजे. देवाची कृपादृष्टी आपल्या देशावर आहे. हवी तेवढी जमीन, मुबलक पाणी, छानदार हवा, कोळसा, लोखंड, सारे सारे त्याने आपल्याला दिले आहे. तुमच्यासारख्या मुलांमुलींनी आता खूप शिकले पाहिजे, खूप खूप काम केले पाहिजे. आपल्या देशात सर्व लोक सुखी झाले पाहिजेत, असे गांधी सांगून गेले आहेत."

बोलता बोलता बाबा थांबले. त्यांनी समोरच्या भारताकडे मोठ्या भक्तीने पाहिले आणि हात जोडले. विद्या आणि मंगला हात जोडून गंभीर स्वराने म्हणू लागल्या, " वंदे मातरम्, सुजलाम् सुफलाम्—"

पाणी तरारणे—मनास वाईट वाटून डोळ्यांत अश्रू येणे. कानावर येणे—ऐकू येणे. हातपाय मोकळे होणे—स्वातंत्र्य मिळणे.

## अभ्यास

१. आपल्या देशाला भारत का म्हणतात ?
२. आपल्या देशात मोठमोठी माणसे कोणती होऊन गेली ?
३. गांधीजींनी सांगितलेल्या कोणत्या गोष्टी या धड्यात तुम्ही वाचल्या ?
४. विद्येने बाबांना कोणता प्रश्न विचारला ? बाबांनी तिला कोणकोणत्या गोष्टी सांगितल्या ?
५. आपला देश कशाने सुखी होईल ?
६. एकनाथ, अहिल्याबाई, कबीर ह्यांच्या चरित्रांतील गोष्टी वाचा व वाचलेल्या गोष्टींपैकी एक गोष्ट तुम्ही सांगा.

---

## ११. चिंगीचा पराक्रम

लग्नसमारंभातून चिंगीची आई घरी परत निघाली. आगगाडीत बायकांच्या डब्यात चिंगीची आई चिंगी-बट्यासह बसली. डब्यात गर्दी होती आणि त्यांना जेमतेम बसण्यापुरती जागा मिळाली. पण चिंगीने हलके हलके खिडकी गाठलीच. खिडकी पकडून बसलेल्या एका बाईला चिंगीची ही रेटारेटी रुचली नाही आणि तिने कपाळावर आठ्या चढवून चिंगीच्या आईकडे पाहिले.

" चिंगे, मागे सरक पाहू मुकाट्याने, त्यांना नको त्रास देऊ." आईने दटावले.

" पण आई, मी त्यांना कुठे त्रास देते आहे ? मी नुसती खिडकीतून बाहेरच्या गमती बघते आहे. "

" कसल्या गमती आहेत ग बाहेर ? ये इकडे. "

" माणसांनी पुष्कळ प्रवास करावा आणि प्रवासात पुष्कळ बघून घ्यावे, असे आमच्या बाई म्हणतात. आणखी बाईंनी सांगितले की, आपण पाहिलेले आपल्याला कळले नाही तर मोठ्या माणसांकडून ते समजावून घ्यावे. आई, आता येथून एक बाई गाढवावर बसून गेली; ती या बाईसारखीच दिसली बघ. यांची बहीण असेल का ग ती ? "

आईने चिंगीला खसकन मागे ओढले आणि आपल्या शेजारी दाबून बसवीत म्हटले, " आता येथून उठलीस आणि एक अक्षर बोललीस तर बघ. "

आपले काय चुकले ते चिंगीच्या ध्यानात आले नाही. ती रडक्या सुरात म्हणाली, " बहिणीचे तोंडवळे सारखेच दिसतात असे वहिनींनी सांगितले परवा. तू आणि मावशी सारख्या दिसता, म्हणून मी विचारले. "

" बरे बरे, समजली अक्कल. "

थोड्या वेळाने एक आंधळी भिकारीण डब्यात आली आणि तिने " मीराके प्रभु गिरिधर नागर " हे गाणे म्हणून भिक्षा मागण्यास सुरुवात केली. तिच्या वाडग्यात कोणी पैसा तर कोणी दोन पैसे टाकले. सहज साठ-सत्तर पैसे मिळाले तिला. पुढच्या स्टेशनावर उतरून भिकारीण दुसऱ्या डब्यात गेली.

" या बाईचा गळा भारी गोड आहे, नाही ? किती छान गाणे म्हटले तिने ! " शेजारीच पुस्तक वाचीत बसलेली एक बाई चिंगीच्या आईला म्हणाली.

" होय बाई गायनशाळेत शिकून सुद्धा इतके सुरेख गाणे म्हणता

यावयाचे नाही. ”

“ तुम्हांला येते का गाणे म्हणायला ? ” चिंगीने मध्येच त्या बाईंना विचारले.

“ हो, येते की साधारण. माझ्या शाळेत लहान मुलींना मीच शिकवते. एका शाळेत शिक्षकीण आहे मी. हौस म्हणून गाणीही शिकवते मी. ”

या दोघींचे बोलणे बब्या रडत उठल्यामुळे थांबले. तो काही केल्या उगा राहीना. ते पाहाताच जागचे हालावयाचे नाही ही ताकीद विसरून चिंगी उठली. आईच्या हातातून बब्याला घेऊन ‘ आपण इंजन बघायला जाऊ या हं ! ’ असे म्हणत ती त्या खिडकीशेजारच्या बाईच्या खुषी-नाखुषीचा विचार न करता पुन्हा खिडकीपाशी घुसली. तिने दाखविलेल्या गमती पाहून बब्या टाळ्या वाजवू लागला.

मधल्या एका स्टेशनावर सर्व अंग झाकून गोषा घेतलेली एक बाई डब्यात आली.

त्या पांढऱ्या सफेत अभ्र्याखाली काय आहे हे चिंगीला समजेना आणि ते समजल्यावाचून तिला चैनही पडेना.

पण तिकडे जायचे कसे ? जागेवरून उठले तर आई रागावेल, मारील सुद्धा. पण चिंगीचे कोडे आपोआपच सुटले. जागा नसली तर कोठे तरी अंग चोरून उभे राहावयाची रीत त्या बुरखेवालीला मानवली नाही. तिने रेटारेटी करीत चिंगीच्या शेजारीच बैठक ठोकली. चिंगीला आता स्वस्थ बसवेना. आपल्याकडे आईचे लक्ष नाही असे पाहून तिने हळूच तिच्या तोंडावरचे झाकण उचलले. बुरखेवालीने चिंगीचा हात झिंजाटून टाकला. तो बाकाच्या मागील फळीवर आपटला आणि चिंगी कळवळली. पण हात झिणझिणण्यापेक्षा तिला दिसलेली गंमत तिच्या मनात अधिक भरलेली होती.

ती आईच्या कानाशी तोंड नेऊन म्हणाली, “ आई, काही बायांना मिशा असतात म्हणून त्या बुरख्यात तोंड लपवतात होय ? ”

“ काही तरीच विचारू नकोस ग. बायकांना मिशा असतात का ? ”

“ या बाईला आहेत. दिसल्या मला. विद्येची शपथ. ”

चिंगीचे हे बोलणे आईने शिक्षकीणबाईंना सांगितले. दोघी गालातल्या गालात हसल्या. पण शिक्षकीणबाईंनी ही गोष्ट हसून सोडून दिली नाही. त्या बुरखेवालीकडे लक्षपूर्वक पाहात राहिल्या.




गाडी थांबताच फिरकीचा तांब्या घेऊन शिक्षकीणबाई पाणी आणायला म्हणून गेल्या, त्या गार्डाला घेऊन आल्या. गार्ड बुरखेवालीला म्हणाला, 'उतर खाली.' बुरखेवाली जागची हालेना. नुसते तिकीट तिने बुरख्यातून बाहेर काढून दाखविले. 'माझ्याजवळ तिकीट आहे. मी नाही उतरणार. बायकामाणसाला का त्रास देतोस?'

डब्याच्या तोंडाशी बघ्यांची गर्दी जमू लागली. पोलीस आला. तो म्हणाला, "उतर खाली. आम्ही तुझी बाईमाणसाकडून झडती घेणार."

बुरखेवाली निघाली. डब्याबाहेर पडताच बुरखा दूर झाला. बुरख्यातून एक तरुण गुंड बाहेर पडला. त्याने धूम ठोकली. सुरा दाखविण्याचा यत्न केला. पण शेवटी त्याला सर्वांनी पकडलेच.

व्रात्यपणाने का होईना, पण चिंगीमुळे तो चोर सापडला. सगळ्याजणी तिचे कौतुक करू लागल्या.

इतका वेळ तुसडेपणा करणारी ती खिडकीशेजारची बाई आपल्या ट्रंकेवर पाय दाबीत म्हणाली, "मौल्यवान जिन्नस बरोबर घेऊन प्रवास

करायला जावे, तर असे होते. देवाची कृपा होती आणि ही पोरगी हुशार होती म्हणून बचावले." टोपलीतून शेवगाठ्या आणि लाडू काढून तिने चिंगीला दिले. चिंगीच्या आईने विचारले, "पण शिक्षकीणबाई, तुम्ही कसे ओळखले ती बाई नाही म्हणून ?"

"अहो, आधीच लक्षात यायला पाहिजे होते आपल्या. पुष्कळ जातीत बायका पुरुषांसमोर डोक्यावरून पदर घेऊन, नाही तर बुरखा घेऊन तोंड लपवितात. पण बायकांच्या डब्यात तोंड उघडे ठेवतात. या चोराने बायकांच्या डब्यात सुद्धा बुरखा काढला नाही. तेव्हाच आपल्याला संशय यायला पाहिजे होता. पण आपण कसल्या ! पाहात बसलो."

"तुम्ही चिंगीच्या चौकस बुद्धीस नावे ठेवली, पण तिनेच दडलेला चोर बाहेर काढला. तिने त्याचे तोंड उघडे केले नसते तर तो कुणाचे तरी गाठोडे घेऊन पसार झाला असता."

आता आई काय बोलणार !

इतक्यात गार्ड आणि पोलीस नाईक डब्याजवळ येऊन म्हणाले, "आम्हांला सहा महिने सतावणारा बदमाष या पोरीच्या हुशारीने सापडला. आम्ही सरकारकडे या मुलीचे नाव बक्षीस देण्यासाठी कळवणार आहोत. तुमचे आणि तुमच्या मुलीचे नाव सांगता का बाई ?"

चिंगी एकदम म्हणाली, "माझे नाव चिंगी आणि माझ्या आईचे नाव आई."

तोंडवळा—चेहरा. गोषा—बुरखा, पडदा. कोडे—पेच. व्रात्यपणा—खोडकरपणा. सतावणारा—त्रास देणारा. चौकस—हुशार, चाणाक्ष. झिंजाटणे—झिडकारणे.

## अभ्यास

१. चिंगीने आईला कोणकोणत्या शंका विचारल्या ? आईने त्या शंकांना कोणती उत्तरे दिली ?
२. बुरखेवालीबद्दल चिंगीला काय वाटले ? तिने मग काय केले ? त्याचा कोणता परिणाम झाला ?
३. चिंगीच्या कोणत्या गुणामुळे गुंड सापडला ?
४. हा धडा वाचताना तुम्ही कोठे कोठे हसला ? तुम्ही का हसला ते सांगा.

---

## १२. खरा कलावंत

आनंदपूरला एक शाळा होती. शाळेतर्फे दरसाल चित्रकलेचे प्रदर्शन भरत असे. जिल्ह्यातील सर्व शाळा या प्रदर्शनात भाग घेत असत. पहिले बक्षीस शंभर रुपयांचे होते. त्याशिवाय अनेक गृहस्थांनी दिलेली बक्षिसे असत.

आनंदपूरच्या शाळेतील अशोक गोरे नावाचा विद्यार्थी लहान वयातही सुंदर चित्रे काढी. जात्याच तो चित्रकार होता. आणि त्यात गुरुजीही चांगले मिळाले होते.

प्रदर्शनासाठी चित्रे पाठविण्यास अजून पंधरा दिवसांचा अवकाश होता. एक दिवस तो सकाळीच घराबाहेर पडला. कोणते नवीन चित्र काढावे आणि पाठवावे याचा विचार अशोकच्या मनात सारखा घोळत होता. रस्त्याच्या रहदारीकडे त्याचे फारसे लक्ष नव्हते.

मागून एक मोटारगाडी भरधाव पुढे गेली. थोड्याच वेळात मोटारीचे ब्रेक खूप जोराने लावल्याचा आवाज झाला. एक केविलवाणी किंकाळी पण ऐकू आली. अशोक धावतच मोटारीजवळ गेला.

मोटार रस्त्याच्या मधोमधच थांबली होती. ड्रायव्हरच्या प्रसंगावधानामुळेच अपघात टळला होता. एका आंधळ्या भिकाऱ्यास उठवून आणि बाजूला नेऊन बसवून ड्रायव्हर पुन्हा मोटार सुरू करीत होता. मोटारीत मागच्या बाजूला बसलेले मालक खिडकीतून डोके काढून म्हणाले, " काय माणसे आहेत पाहा! दिसत नाही तर एका जाग्यावर बसून भीक मागायचे सोडून रस्त्यावर कशाला आला हा आंधळा ! "

अशोक म्हणाला, " मोटारीतून आंधळ्याला सरकारी दवाखान्यात नेऊ या. कुठे लागले का पाहू. "

मोटारीचे मालक म्हणाले, " छे ! मला आधीच उशीर झाला आहे निघायला. वेळेवर गावी पोहोचले पाहिजे. चल रे सोड गाडी. " धुरळा उडवीत गाडी भरधाव निघून गेली.

भिकाऱ्याला लागले नव्हते. काठी आडवी ठेवून गुडघ्यावर मान टेकून तो बसला होता. अशोकने जवळ जाऊन म्हटले, " बाबा, बरे झाले ! थोडक्यात जीव वाचला. माझे घर जवळच आहे. थोडा वेळ पडा. मग कुठे जायचे

असेल तेथे पोचवितो तुम्हांला."

आंधळा खिन्नपणे हसून म्हणाला, "कशाला भाऊ त्रास घेता? माझ्या नशिबातच नाही. मरण कसे चालून आले होते. आणखी दुसरीकडे कुठे पोचविणार मला? सारे रस्ते माझे घरच आहेत. तो मोटारवाला नाही गेला! तुम्हीही जा. माझा काय उपयोग तुम्हांला?"

खिशातले दहा पैसे आंधळ्याच्या हातावर ठेवीत अशोक म्हणाला, "उपयोग नाही कसा? सध्या हे घ्या. माझ्या चित्राला बक्षीस मिळाले तर ते तुमचे."

अशोक झपझप घरी आला. चित्रकलेचे साहित्य काढून मनात योजलेल्या विषयाचे कच्चे चित्र त्याने काढले. त्यानंतर सारखे पाचसहा दिवस खपून त्याने ते चित्र पुरे केले.

प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. निसर्ग-देखावे, हसरी मुले, युद्धप्रसंग, प्राणी व पक्षी, अशी अनेक चित्रे मांडली होती. सारी चित्रे पाहात पाहात प्रेक्षक येत व अशोकने काढलेल्या चित्राजवळ एकदम थबकत. ते चित्र हटकून साऱ्यांचे लक्ष वेधून घेई. जो तो म्हणे—

"किती हुबेहूब चित्र काढले आहे या चित्रकाराने! ती शून्य नजर, चेहऱ्यावरच्या सुरकुत्या, कपाळास पडलेल्या आठ्या, खपाट झालेले पोट, जमीन चाचपणारी बोटे, सारे सारे कसे खरेच वाटत आहे. हा आंधळा भिकारी कळवळून काही तरी सांगतो आहे, असे वाटते. आणि धुरळा उडवीत दूर निघून गेलेली ती मोटार! किती खोल अर्थ भरला आहे या चित्रात! खरा कलावंत आहे हा चित्रकार!"

परीक्षक-मंडळानेही अशोकच्या चित्रास पहिले बक्षीस जाहीर केले.

दुसऱ्या दिवशीं बक्षीस-समारंभ झाला. समारंभाचे अध्यक्ष एक प्रख्यात चित्रकारच होते. सर्वच प्रदर्शन चांगले असल्याचा त्यांनी अभिप्राय दिला. अशोकच्या चित्रकलेची त्यांनी फार प्रशंसा केली.

पहिले बक्षीस घेण्यासाठी अशोक व्यासपीठावर गेला. अध्यक्षांशेजारी एक गृहस्थ बसले होते. त्यांनी स्वतःचे एक बक्षीस अशोकला देण्यासाठी अध्यक्षांना सांगितले.

पण अशोक नम्रपणाने म्हणाला, “हे बक्षीस मला घेता येत नाही. क्षमा असावी.”



साऱ्यांनाच आश्चर्य वाटले. “अरे, पण असे का?” हा प्रश्न साऱ्यांच्याच तोंडून निघाला. तो गृहस्थ गोंधळून गेला. अशोक पुन्हा बोलू लागला. सगळीकडे शांतता पसरली होती.

अशोक म्हणाला,

“माझे चित्र तुम्हांला आवडले. आभारी आहे मी. तुमच्यात माणुसकी आहे म्हणून चित्रातल्या आंधळ्या भिकाऱ्याची तुम्हांला कीव आली. माझ्या चित्रातला प्रसंग हा अगदी आपल्या गावात प्रत्यक्ष घडलेला आहे. मोटारीच्या मालकांनी—ह्या गृहस्थांनी त्या भिकाऱ्याला त्या वेळी मदत केली नाही. पण भिकाऱ्याच्या चित्राला बक्षीस देऊ केले आहे! चित्र काढण्यात कलावंताला जो आनंद मिळतो तो मला मिळाला आहे. आपला आग्रहच असेल तर मी हे पैसे त्या भिकाऱ्यास देण्यासाठी म्हणून स्वीकारतो.”

“शाबास अशोक!” सारी सभा जणू एकमुखाने बोलली. मोटारमालकांनी त्याची पाठ थोपटली. ते त्याला जवळ घेत म्हणाले, “तू आणि तुझ्या चित्राने मला आज माणुसकी शिकविली. खरा कलावंत आहेस तू!”

उद्‌घाटन करणे—उघडणे, खुले करणे. जात्याच—स्वभावतः

### अभ्यास

१. अशोकने कोणते चित्र काढले ? प्रेक्षक अशोकच्या चित्राजवळ का थांबत ?
२. अशोकने मोटारमालकाचे बक्षीस प्रथम का नाकारले ? मागाहून ते त्याने कशासाठी स्वीकारले ?
३. मोटारमालकांनी अशोकची पाठ का थोपटली ?
४. अशोक 'खरा कलावंत' कसा ? त्याचे कोणते गुण या धड्यांत दिसून येतात ?
५. तुम्ही पाहिलेल्या प्रदर्शनाचे थोडक्यात वर्णन करा.

---

## १३. तृणबाळे होऊ !

[ तृण म्हणजे गवत. आपण जर गवताची बाळे झालो तर आपल्याला कोणकोणती मौज करायला मिळेल, याचे या कवितेत मोठे मजेदार वर्णन केले आहे. ]

तृणबाळे होऊ, क्षणभर, तृणबाळे होऊ;
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

पैंजण घालुन नाचत मुरडत
निर्झर येइल ठुमकत ठुमकत,
हसून करु या त्याचे स्वागत,
तुषारात न्हाऊ, क्षणभर, तुषारात न्हाऊ;
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

चपल वारुवर आरुढ होउन
उटी फुलांची अंगी लावुन
अवखळ वारा येइल धावुन,
डुलत झुलत राहू, क्षणभर, डुलत झुलत राहू;
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

निळे जांभळे लेउन मंदिल
रानफुलांचे थवे शोभतिल
गोड गोड गुजगोष्टी करितिल,
त्या ऐकत राहू, क्षणभर, कान हळुच देऊ;
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

लांब सावल्या पडता, गगनी
रंग नाचतिल फेर धरोनी,
सोन्याची मग होईल धरणी,
टक लावुन पाहू, क्षणभर, टक लावुन पाहू;
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

आणि कधिमधी सायंकाळी
येतिल फिरण्या बालमंडळी
हळु पायाला करुनि गुदगुली
गमतीने हसवू, क्षणभर, गमतीने हसवू
गड्यांनो, तृणबाळे होऊ.

—कृष्ण बळवंत निर्कुंब

निर्झर—ओढा. वारू—घोडा. अवखळ—खोडकर. मंदील—फेटा, पागोटे. धरणी—जमीन.

**अभ्यास**

१. तृणबाळे होऊन काय करावेसे वाटते ?
२. निर्झराच्या कोणकोणत्या हालचाली वर्णन केल्या आहेत ? त्याचे स्वागत कसे करणार ? का ?
३. अवखळ वारा काय काय करीत येतो ? त्या वेळी तृणबाळे काय करणार आहेत ?
४. रानफुले गुजगोष्टी कशा प्रकारे करतात ? तृणबाळे त्या कशा काय ऐकतील ?
५. सायंकाळचे वर्णन कोणत्या कडव्यात केले आहे ? त्यास सायंकाळचे वर्णन का म्हणावयाचे ?
६. तृणबाळे बालकांना गुदगुल्या कशा रीतीने करू शकतील ? त्यामुळे काय होईल ?

# १४. वीर गायधनी



काही वर्षांपूर्वी नाशिक शहरात घडलेली गोष्ट आहे ही! रात्रीचा एकदीडचा सुमार होता. सारे शहर शांत झोपले होते. इतक्यात घण घण घण अशी घंटा वाजू लागली. झोपलेले लोक जागे झाले. पाहातात तो एका तीन मजली घराला आग लागली होती. घरात बिऱ्हाडेही बरीच होती.

'आग! आग!!' एकच आरोळी उठली. घरातील माणसे जीव घेऊन बाहेर पळाली. गोठ्यातील गाई-म्हशी कोणी तरी सोडून दिल्या. त्या बिचाऱ्या पळाल्या! पण दुसऱ्या मजल्यावरील एका बिऱ्हाडातील काही मुले मात्र वर तशीच अडकून राहिली. त्यांतील एक मूल पाळण्यात झोपले होते.

धुराच्या लोटाने सारे घर कोंदले. ते चिमुकले जीव घाबरून गेले. 'आईऽऽ आईऽऽ' अशा करुण किंकाळ्या मारू लागले. बिचाऱ्या त्यांच्या मातेची काय अवस्था झाली असेल! ती शोकाने वेडीच बनली. तिला कसलेच भान राहिले नाही. मुलांना वाचविण्याकरिता ती स्वतःच

आगीकडे धावली. एका गृहस्थाने तिला मागे खेचले. "सोडा! सोडा!! माझी लेकरे वर अडकली आहेत. त्यांना मी घेऊन येते. सोडा मला!" पण लोकांनी तिला तसे करू दिले नाही.

रस्त्यावर दोन तीन हजार जनसमुदाय जमला होता. आगीने घराचा चारही बाजूंचा ताबा घेतला होता. कोणीही धजेना त्या आगीत शिरायला! जीव कोणाला नकोसा आहे? जाणूनबुजून कोण आपला जीव धोक्यात घालील? मग घरात अडकलेल्या चिमुकल्या जीवांचे काय होणार!

आगीची घंटा इतरांप्रमाणे एका तरुणाने ऐकली मात्र! झोपेतून तो खडबडून जागा झाला आणि ज्वालांच्या रोखाने सारखा धावत तो आगीच्या ठिकाणी आला. या वेळी दुसऱ्या मजल्यावरच्या जिन्याने पेट घेतला होता. आग विझविण्याचा प्रयत्नही चालूच होता. पण आगीपुढे कोणाची मात्रा चालेना.

तरुणाने आपल्या अंगाभोवती एक सतरंजी बांधली व लगेच तो त्या आगीत शिरला.

"अरे! काय म्हणावे या गृहस्थाला?" गर्दीतला एक म्हणाला. "एवढ्या भयंकर आगीत शिरला कशाला? केवढा हा अविचार!" दुसरा म्हणाला. "आणि एवढे धाडस करून शेवटी मुलांना वाचविणार कसा?" त्याच्या शेजारचा उद्गारला. "छे! जाणूनबुजून त्याने मृत्यूच्या जबड्यात उडी घेतली!" असे एक ना दोन अनेक उद्गार जमलेल्या मंडळीतून निघाले.

"अरे कोण हा?" "अहो हा बापूराव गायधनी."

तो तरुण जळत्या जिन्यावरून माडीवर गेला. खोलीत इतका धूर कोंडला होता की, त्याला श्वास देखील धड घेता येईना! त्याने भराभर एकेका पोराला गादीत गुंडाळले आणि खाली जमलेल्या लोकांना खूण करून त्यांच्याकडे मुलांना झोकून दिले. आता मात्र लोकांना त्याच्या हुशारीचे कौतुक वाटले. "शाबास! भले शाबास! वा रे वीर!" असे लोकांच्या तोंडून उद्गार बाहेर पडले.

आईला आपली मुले मिळाली. केवढा आनंद झाला तिला! तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळू लागले. आनंदाच्या भरात तिने मुलांना हृदयाशी घट्ट कवटाळून पटापट त्यांचे मुके घेतले.

बापूराव आता खाली आला. त्याचा चेहरा भेसूर दिसत होता. डोक्याचे केस अर्धवट जळाले होते; डोळे इंगळासारखे लाल झाले होते आणि शरीर

ठिकठिकाणी भाजून निघाले होते. चेहरा विद्रूप झाला होता; पण त्यावर विजयाचे समाधान दिसत होते. इतक्यात आतील गोठ्यातून गाईचा हंबरडा ऐकू आला. लोक 'नको नको' म्हणत असता तो वीर गाईची सुटका करण्यासाठी पुन्हा आत गेला. इतक्यात घराचा मागील भाग धाडकन् कोसळून पडला. लोकांच्या पोटात धस्स झाले. तो गाईपाशी पोहोचतो न पोहोचतो, तोच जळती तुळई वरून सुटली. ती त्याच्या डोक्यावर पडणार, इतक्यात त्याने प्रसंगावधान राखून ती आपल्या डाव्या हाताने वरच्यावर उंच पेलून धरली आणि तो गाय सोडू लागला. दावे लवकर सुटेना. प्रत्येक क्षण मोलाचा हे ओळखून त्याने आपले सारे बळ एकवटून दाव्याला जोराचा हिसका मारला. त्याबरोबर खुंट्यासह दावे त्याच्या हाती आले. कोठून एवढे भीमाचे बळ त्यास आले होते कोणास ठाऊक! गाईस जीवदान देऊन त्याने आपले 'गायधनी' हे नाव सार्थ केले.

मोठ्या समाधानाने तो आगीतून बाहेर आला. वाचविलेल्या बालकांकडे व त्यांच्या आईकडे दृष्टी टाकताच तो खाली पडला. गर्दी उसळल्यामुळे पोलिसांना ती हटविता हटविता नाकी नऊ आले.

डॉक्टरांनी त्यास वाचविण्यासाठी आटोकाट प्रयत्न केले. परंतु आगीच्या जखमा भयंकर असल्यामुळे त्यांच्या प्रयत्नांवर पाणी पडले. आठ दिवसांनी हा वीर साऱ्या गावाला दुःखात लोटून जग सोडून गेला.

साऱ्या शहरावर दुःखाची छाया पसरली. प्रत्येकाच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू वाहू लागले. जो तो त्याच्या पराक्रमाचे पोवाडे गाऊ लागला. परमपूज्य बापूजींना जेव्हा ही हकीकत कळली तेव्हा त्यांनी या वीराच्या धाडसाचे कौतुक केले. "बापू गायधनीची मातापितरे जिवंत असतील तर त्यांना आपल्या मुलाच्या शूरत्वाबद्दल धन्यता वाटेल," असे त्यांनी उद्गार काढले.

या वीराने आपले प्राण विनाकारण खर्ची घातले नाहीत! त्याचा स्वतःचा जीव गेला खरा, परंतु त्याने कोवळ्या मुलांना व मुक्या जीवांना वाचविले व लोकांना आत्मत्यागाचा आणि शौर्याचा अपूर्व धडा घालून दिला. लोकांनी त्याला 'वीर' ही बहुमानाची पदवी देऊन त्याचे स्मारक नाशिक शहरात उभारले आहे.

धन्य तो वीर बापूराव व धन्य आपला देश!

रोखाने—दिशेने. मात्रा—इलाज. विद्रूप—दिसायला वाईट. अपूर्व—पूर्वी कधी न झालेला. जग सोडून जाणे—मरण पावणे. पाणी पडणे—केलेले प्रयत्न फुकट जाणे. नाकी नऊ येणे—अगदी कठीण होणे.

### अभ्यास

१. बापू गायधनी याने कोणते मोठे काम केले ? त्यामुळे त्याला लोकांनी कोणती पदवी दिली ?

२. बापू गायधनीबद्दल जमलेले लोक आरंभी काय म्हणाले ? ते असे का म्हणाले ? बापू गायधनीने त्यांचे म्हणणे का ऐकले नाही ?

३. बापू गायधनीबद्दल महात्मा गांधींनी कोणते उद्‌गार काढले ?

४. मात्रा चालणे, आरोळी ठोकणे, मृत्यूच्या जबड्यात उडी घेणे, भीमाचे बळ येणे व पोवाडे गाणे, यांचा अर्थ सांगा.

५. खाली दिलेल्या विषयांवर प्रत्येकी १० वाक्ये तयार करा :—

(१) उधळलेला बैल.
(२) नदीला आलेला पूर.
(३) पिसाळलेला कुत्रा.

---

## १५. गुरुदक्षिणा

[ सांदीपनीचा आश्रम. सांदीपनी ऋषी ध्यान करीत बसले आहेत. ]

**सांदीपनी** : या कृष्णाने माझ्या मनाला काय मोहिनी घातली आहे काही समजत नाही. जरा कोठे दृष्टीआड झाला, की जिवाला चुकल्याचुकल्यासारखे वाटते. कौशिका, आता तू बाहेरून आलास, कन्हैया तुला कोठे दिसला का ?

**कौशिक** : तो आज सकाळीच रानात गेला. त्याच्याबरोबर बलराम व सुदाम देखील आहेत.

**सांदीपनी** : रानात ? आणि इतक्या सकाळी ?

**कौशिक** : आईने त्यांना सांगितले, लाकडे तोडून आणा.

**सांदीपनी** : काय ? कन्हैयाला लाकडे तोडायला पाठविले ? आश्रमातील बाकीच्या कुमारांना का नाही सांगितले ? मला का नाही विचारले ?

**कौशिक** : पण बाबा, कन्हैयाने लाकडे तोडून आणली म्हणून काय झाले ? इतर कुमार नाहीत का रोज आणीत ?

**सांदीपनी** : नाही, नाही. कन्हैया इतर कुमारांसारखा नाही.

**कौशिक** : बाबा, सर्व कुमारांमध्ये तुम्हांला कन्हैयाच फार आवडतो.

**सांदीपनी** : नाही बाळ, माझे सर्वांवर प्रेम आहे. तू माझा जसा लाडका तसा कन्हैया पण आहे. सारेच कुमार मला सारखे आहेत.

**कौशिक** : मग बाबा, मी तुमच्या एका मांडीवर बसेन आणि कन्हैया दुसऱ्या मांडीवर बसेल. गंमत होईल, नाही ? बरे का बाबा, आज कन्हैया किंनई मला रानातून फुलांचा हार करून आणणार आहे. गोकुळात त्याचे गुराखी मित्र जसा हार गुंफतात अगदी तसाच हार तो गुंफणार आहे. मग तो गळ्यात घालून मी खूप नाचेन बरे का !

**सांदीपनी** : वा ! छान छान !

[ एक ऋषिकुमार धावत येतो. ]

**कुमार** : गुरुमहाराज, घात झाला ! दुष्ट जरासंधाच्या सैन्याने आपल्या आश्रमाला वेढा घातला. आपल्या आश्रमात कृष्ण दडून बसला आहे, अशी त्याला कोणी तरी नक्की बातमी दिली. त्याचा सेनापती इकडेच निघाला आहे.

**सांदीपनी** : काय कृष्णाला पकडायला सेनापती इकडे येत आहे ? अरेरे ! मग घात झाला !

**कौशिक** : काय ? माझ्या कन्हैयाला पकडून न्यायला तो राक्षस आला आहे ? नाही, मी कन्हैयाला कधीही नेऊ देणार नाही. मग तुमच्या दुसऱ्या मांडीवर कोण बसणार ? बाबा, तुम्ही मघाशी म्हणालात ना, की आम्ही दोघे तुम्हांला सारखे आहोत ?

**सांदीपनी** : होय, बाळ. म्हणूनच मला दुःख होत आहे. कन्हैया म्हणजे या आश्रमाची शोभा.

**कौशिक** : बाबा, मुळीच काळजी करू नका. ते दुष्ट राक्षस आज येथे आले म्हणजे त्यांच्यापुढे मी उभा राहीन आणि सांगेन, 'मी कृष्ण

आहे. न्या मला पकडून.' मला पकडून नेल्यावर कन्हैयाच्या जिवाला काडीइतका अपाय होणार नाही.

**सांदीपनी** : बाळा, बाळा, काय बोलतोस तू ? वत्सा, खरा पुत्र आहेस ! बापाच्या सुखासाठी, आश्रमाच्या सुखासाठी स्वतःचा प्राण द्यायला तू तयार होतोस ! पण मृत्युच्या तोंडी तुला देऊन मी कसा जगू ? नाही. कन्हैयासाठी ह्या सांदीपनींचा प्राण आधी जाईल व मग कन्हैयाच्या अंगाला हात लागेल.

**कुमार** : पण तुमच्या मरणाने कृष्णाचा प्राण थोडाच वाचेल ? कौशिक म्हणतो तसे होईल तर—

**सांदीपनी** : पण कौशिका, तूच कृष्ण म्हणून त्यांचा विश्वास कसा बसेल ?

**कुमार** : त्याची नका काळजी करू. मी त्याला युक्ती करतो.

[ कौशिकास एका वल्कलात गुंडाळून खांद्यावर घेतो व चालू लागतो. सैनिक कुमाराला मागे रेटीत आणतात. ]

**सेनापती** : काय रे, काय घेऊन चालला आहेस ? ठेव, ठेव खाली हे तुझे ओझे.

**कुमार** : नाही, नाही. आत आमच्या गुरुजींची वल्कले आहेत. मी ती उन्हात वाळवायला निघालो आहे.

**सेनापती** : दाखव सोडून बघू. ( कौशिक आतून निघतो. ) अरे हा कोण ?

**सैनिक** : हाच तो कृष्ण ! जरासंध महाराज की जय !

**सेनापती** : बस्स ! झाले आपले काम. अरे चोरा ! ही तुझी वल्कले वाटते ? बोल, हाच कृष्ण की नाही ? त्याला चोरून पळवून चालविले होतेस, नाही का ?

**कुमार** : नाही, तो कृष्ण नाही. तो—तो—तो—तो—

**सेनापती** : अडखळलास, बघ. तू कितीही नाही म्हटलेस तरी आमचा त्यावर विश्वास बसणार नाही. हं, चला सैनिक हो, उशीर करू नका. उचला याला.

**सांदीपनी** : थांबा, थांबा. सेनापती, हा कृष्ण नाही.

**सेनापती** : हा कृष्ण नाही, तर म्हाताऱ्या, हे काय तुझे कारटे आहे ?

**सांदीपनी** : होय, हा माझा मुलगा आहे !

**सेनापती** : साऱ्या आश्रमातील पोरे देखील तुझीच मुले आहेत ! म्हाताऱ्या, इतके केस पिकले तरी खोटे बोलतोस ! काय रे, तू कृष्णच की नाही ?

**कौशिक** : होय, मीच कृष्ण.

**सेनापती** : बघ थेरड्या, हा काय सांगतो ते ऐक. लहान मुलांना खरे बोलण्याची जितकी अक्कल आहे तितकी देखील तुला नाही. चला रे.

**कौशिक** : सेनापती, मला गुरुजींच्या चरणी वंदन करू द्या. गुरुमहाराज, येतो. आजपर्यंत शिकविलेल्या ज्ञानाबद्दल मी आपले उपकार कोणत्या शब्दांनी मानू ! त्या उपकाराची फेड आता या जन्मी होणार नाही.

[ सेनापती व राक्षस कौशिकास घेऊन जातात. ]

**सांदीपनी** : अरेरे ! हे मी काय केले ? बाळा कौशिका, आठच वर्षांचा तू. पण केवढा हा तुझा स्वार्थत्याग ! ( कृष्ण, बलराम व सुदाम लाकडे घेऊन येतात. )

**कृष्ण** : ( लाकडांची मोळी खाली ठेवून ) गुरुजी, वनात लाकडे तोडायला आम्ही गेलो होतो. काय मौज झाली ! ( थांबून ) पण गुरुजी, मी हे काय पाहातो ! आपल्या डोळ्यांत अश्रु ! बोलत का नाही ? कौशिक कोठे गेला ? हा पाहा त्याला मी हार आणला आहे.

**सांदीपनी** : कन्हैया, आपला कौशिक—आपला कौशिक—नाही, नाही मला सांगवत ! तुझ्यावर, छे ! कौशिकावर, नाही, आपल्या आश्रमावर आज मोठे संकट आले होते. त्या सर्वांतून कौशिकाने सुटका केली.

**कृष्ण** : म्हणजे ? काय म्हणता गुरुजी ? कुमारा, काय प्रकार आहे हा ?

**कुमार** : कन्हैया, तुला पकडण्यासाठी जरासंधाचा सेनापती आपले सैनिक घेऊन येथे आला होता. त्याने सर्व आश्रमाला गराडा दिला. तू बाहेर गेला होतास; तेव्हा त्याला फसविण्यासाठी कौशिकाने आपण कृष्ण आहो असे सांगितले. सेनापती त्याला खरोखरीच घेऊन गेला !

**कृष्ण** : काय ? माझ्याऐवजी राक्षसांनी कौशिकाला पकडून नेले ? काय ऐकतो मी ! गुरुजी, काय केलेत तुम्ही हे !

**सांदीपनी :** कृष्णा, हे मी माझे कर्तव्य केले. जोपर्यंत तू माझ्या आश्रमात आहेस तोपर्यंत तुझ्या केसाला देखील धक्का लागणार नाही, अशी काळजी मला घेतलीच पाहिजे.



**कृष्ण :** पण गुरुजी, कौशिकाचे प्राण संकटात असता जिवंत राहण्यापेक्षा मरण फार उत्तम ! थांबा, हा अस्सा जातो आणि त्या राक्षसांच्या तावडीतून त्याला मी परत आणतो ! प्रत्यक्ष यमाच्या पाशातून त्याला परत आणण्यास मी चुकणार नाही. मग त्या जरासंधाची काय कथा ! कंसाच्या पाठोपाठ त्याचीही रवानगी करतो !

**सांदीपनी** : कृष्णा, कौशिक गेला आणि तूही चाललास ! तुम्ही दोघेही मला सोडून जाणार !

**कृष्ण** : गुरुजी, आपल्या कौशिकाला सोडवून या चरणांपाशी आणीन, हीच माझी प्रतिज्ञा ! गुरुमाउली, आपण विद्या शिकवून जे उपकार केले ते फेडण्यासाठी मला ही गुरुदक्षिणा द्यायलाच पाहिजे ! ( जातो. )

ध्यान—चिंतन. वल्कल—झाडाच्या सालीचे वस्त्र. प्रतिज्ञा—निश्चय.

## अभ्यास

१. कृष्णावर कोणते संकट आले होते ? त्याचे संकट कोणी टाळले ? कशा रीतीने ? गुरू सांदीपनींना त्याबद्दल काय वाटले ? कृष्णाने कोणती प्रतिज्ञा केली ? का ?

२. कौशिकाने सांदीपनीकडे कोणती तक्रार केली ? का ? सांदीपनींनी त्याला काय सांगितले ?

३. कुमाराने सेनापतीला कसे फसविले ?

४. हा नाट्यप्रवेश गोकुळाष्टमीच्या दिवशी शाळेत करून दाखवा.

---

# १६. ज्योत

[ तुम्ही दिवटी पाहिली असेलच. त्या दिवटीपासून ज्योतीचे रूप कसकसे बदलले, हे या कवितेत वाचा. ]



आधी होते मी दिवटी शेतकऱ्यांची आवडती
झाले इवली मग पणती घराघरातुन मिणमिणती !
समई केले मला कुणी देवापुढती नेवोनी
निघुनी आले बाहेर सोडित काळासा धूर !
काचेचा मग महाल तो कुणी बांधुनी मज देतो
कंदिल त्याला जन म्हणती मीच तयातिल परि ज्योती.
बत्तीचे ते रूप नवे पुढे मिळाले मज बरवे
वरात मजवाचून अडे झगझगाट तो कसा पडे !
आता झाले मी बिजली घरे मंदिरे लखलखली.
देवा ठाउक काय पुढे नवा बदल माझ्यात घडे.
एकच ठावे काम मला प्रकाश द्यावा सकलांला
कसलेही मज रूप मिळो देह जळो अन् जग उजळो ! !

—वि. म. कुलकर्णी

## अभ्यास

१. ज्योतीने कोणकोणती रूपे घेतली ? आज तिचे नवे रूप कोणते ? पुढे कोणते रूप मिळणार याबद्दल ज्योत काय म्हणते ? ज्योतीला एकच काम माहीत आहे. ते कोणते ?
२. ज्योतीने निरनिराळी रूपे घेतली तेव्हा ती प्रत्येक वेळी कोणते काम करी ?
३. या शब्दांचा वाक्यांत उपयोग करा :—इवली, मिणमिणती, झगझगाट, लखलखणे, उजळणे.
४. ज्योत स्वतःची गोष्ट सांगते. पुढे दिलेल्या वस्तूंच्या अशा गोष्टी लिहा :— सुरी, टाक, पुस्तक.

---

# १७. ज्ञानेश्वर

पैठण शहराजवळ आपेगाव नावाचे एक खेडे आहे. तेथे विठ्ठलपंत नावाचे गृहस्थ राहात असत. लहानपणापासून त्यांचा देवाधर्माकडे ओढा होता. वीसबावीस वर्षांचे असतानाच त्यांनी तीर्थयात्रा केल्या. पुढे त्यांचे लग्न झाले; पण त्यांचे मन संसारात रमेना. ते तीर्थयात्रेला पुन्हा निघून गेले. काशीस गेल्यावर श्रीपादस्वामींकडून त्यांनी संन्यास घेतला.

पुढे श्रीपादस्वामी रामेश्वराच्या यात्रेस निघाले. वाटेत ते आळंदी येथे उतरले. आळंदीस विठ्ठलपंतांच्या पत्नी माहेरी येऊन राहिल्या होत्या. त्या श्रीपादस्वामींच्या दर्शनास आल्या. भेटीत त्यांची सारी हकीकत स्वामींच्या कानावर आली. पत्नीला न विचारताच विठ्ठलपंतांनी संन्यास घेतला हे स्वामींना आवडले नाही. ही गोष्ट धर्माला मान्य नाही, असे त्यांनी विठ्ठलपंतांना काशीस गेल्यावर सांगितले. स्वामीजींच्या सांगण्यावरून विठ्ठलपंत आपेगावी परत गेले व संसार करू लागले.

पुढे विठ्ठलपंतांना चार मुले झाली. त्यांची नावे निवृत्ती, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई अशी होती. संन्यास घेतल्यावर पुन्हा संसार करणे हे त्या वेळच्या लोकांना पसंत नव्हते. लोकांनी त्यांना वाळीत टाकले. लोक त्यांना पंक्तीस घेईनात. मुलांच्या मुंजी करता येईनात.

पण विठ्ठलपंतांनी मुलांना लहानपणापासून विद्या शिकविली. प्रपंचात पुन्हा पडून आपण मोठी चूक केली, या गोष्टीचे विठ्ठलपंतांना वाईट वाटून

ते काशीस गेले. रुक्मिणीबाई बरोबर गेल्या. दोघांनी गंगेत आपले प्राण अर्पण केले. इकडे मुले एकटीच राहिली.

निवृत्ती व ज्ञानदेव हे त्यातल्या त्यात मोठे होते. ज्ञानदेव माधुकरी मागून आणी व धाकट्या भावंडांना जेवू घाली. त्यांनी आपला अभ्यास मात्र चालू ठेवला. ज्ञानदेव हा विलक्षण बुद्धिमान होता. या भावंडांना वाटू लागले की, आपल्या मुंजी व्हाव्या. आपणाला ब्राह्मणांनी शुद्ध करून घ्यावे. म्हणून ती सारी पैठणास गेली. तेथील विद्वान ब्राह्मणांना त्यांनी आपली सर्व हकीकत सांगितली व विनंती केली की, 'आम्हांला शुद्ध करून घ्यावे.' तेव्हा ते विद्वान ब्राह्मण म्हणाले, "तुम्ही संन्याशाची मुले. आम्ही तुम्हांला कसे बरे शुद्ध करून घ्यावे ? तुम्ही देवाची भक्ती करीत राहा म्हणजे तुम्ही शुद्ध व सुखी व्हाल." ज्ञानदेव त्यांना म्हणाले, "ईश्वराची भक्ती तर करूच. आम्हांला तुम्ही निराळे का समजता ? आम्ही-तुम्ही तर सारी एकाच परमेश्वराची लेकरे आहोत. सर्व प्राण्यांच्या ठिकाणी ईश्वर आहेच !" ते ऐकून ते ब्राह्मण हसू लागले. ते म्हणाले, "अहो ज्ञानदेव, तुम्ही म्हणता की, सर्वांच्या ठिकाणी परमेश्वर भरलेला आहे. तर मग हा पलीकडे जो रेडा दिसत आहे, त्याच्यात व तुमच्यात एकच परमेश्वर भरलेला असेल ?"

"हो, हो, हे खरेच आहे."

यावर त्या लोकांनी त्या रेड्याच्या पाठीवर काठीने फडाफड तडाखे मारले.

"तुम्ही व रेडा जर एकच आहात् तर काठीचे वळ तुमच्या पाठीवर उठले पाहिजेत."

ज्ञानदेवाने आपली पाठ फिरविली आणि ते ब्राह्मण पाहातात तो त्याच्या पाठीवर खरोखर वळ उठलेले दिसले !

"तुम्ही दोघे जर एक आहात तर तुम्हांला जे येते ते या रेड्यालाही येत असले पाहिजे."

"हो, हो, हेही खरेच आहे." इतके बोलून त्याने संस्कृत मंत्र म्हटला व रेड्यास सांगितले की, "तू हा मंत्र म्हण." त्याबरोबर रेड्याने तो म्हणून दाखविला !

सारे लोक चकित झाले ! 'तुम्ही देवाचे अवतार आहात,' असे म्हणून

ब्राह्मण ज्ञानदेवाच्या पाया पडले.

यानंतर ही भावंडे नेवासे येथे आली. तेथे असताना ज्ञानेश्वरांनी गीतेतील संस्कृत श्लोकांचा अर्थ सोप्या मराठी भाषेत जनतेला सांगितला. सच्चिदानंद बाबांनी त्या ओव्या जशाच्या तशा लिहून घेतल्या. तीच सुप्रसिद्ध ज्ञानेश्वरी. त्यांना सारे लोक आदराने " ज्ञानेश्वरमहाराज " म्हणू लागले.



पुढे ज्ञानेश्वर हे नामदेवाच्या भेटीस गेले. नामदेव हे महान भक्त होते. परस्परांची मोठीच मैत्री जमली. देवाच्या आणि भक्तीच्या गोष्टी करावयास सापडाव्या म्हणून ज्ञानदेव आणि नामदेव हे दोघे यात्रेला निघाले. मोठमोठी तीर्थे व क्षेत्रे पाहात ते परत आळंदीला आले. यात्रा चालू असता आणि आळंदीस परत आल्यावर ज्ञानेश्वरांनी शेकडो अभंग रचिले.

काही दिवसांनी ते म्हणू लागले की, " आता मला जगावयाचे कारणच उरले नाही. माझे सगळे काम झालेले आहे. मी ज्ञानेश्वरी लिहिली, अमृतानुभव लिहिला, अभंग लिहिले. मी विठ्ठलाची भक्ती केली. मला हवे होते ते सारे साधले. माझ्या जन्माचे सार्थक झाले. आता मला जगण्याचे कारणच नाही. " मग महाराजांच्या मित्रांनी व शिष्यांनी एक खोल व मोठी जुनाट समाधी हुडकून काढली. ती त्यांनी झाडून, सारवून, धुऊन स्वच्छ केली. आत एक मोठे सुंदर आसन तयार केले. त्यावर

शुभ्र वस्त्र घातले. भोवताली समया लावल्या. पुढे नीरांजने लाविली. सुवासिक फुलांच्या माळा बांधल्या. समोर ज्ञानेश्वरीची पोथी ठेविली. अशा रीतीने ज्ञानेश्वरमहाराजांनी समाधी घेतली. सर्वांनी विठ्ठलाच्या नावाचा जयजयकार केला.

ती समाधी अजून आळंदीस आहे. लाखो लोक तिच्या दर्शनासाठी आळंदीस जातात.

वाळीत टाकणे—जातीच्या बाहेर टाकणे. शुद्ध करून घेणे—पुन्हा जातीत घेणे.

**अभ्यास**

१. ज्ञानदेव पैठणला कशाकरिता गेले ? तेथे काय काय घडले ?
२. ज्ञानदेवाला लोक 'ज्ञानेश्वरमहाराज' असे केव्हापासून म्हणू लागले ? ज्ञानेश्वरांनी कोणकोणते ग्रंथ लिहिले ?
३. ज्ञानेश्वरमहाराजांनी कोणता चमत्कार करून दाखविला ? कोणाला ? का ?
४. समाधी घ्यावी असे ज्ञानदेवांना केव्हा वाटू लागले ? समाधी घेताना काय काय करावे लागले ?

---

# १८. आईची शिकवण

येशा सुमारे आठ वर्षांचा असेल. गर्दीत लोकांचे खिसे कापून पैसे लांबविण्यात तो तरबेज झाला होता. ही किरकोळ उचलेगिरी गेनूने येशाला तीन वर्षांपूर्वीच पढविली होती. आपल्यापेक्षा आपला मुलगा सवाई भामटा झाला पाहिजे, असे त्याला वाटे.

पण येशाच्या आईला हे आवडले नाही. ती म्हणाली, "तुम्ही काय वाटेल ते करा, पण पोराला हे शिकवू नका."

गेनू हसला आणि म्हणाला, "बापजाद्यांचा धंदा कधी वंगाळ होईल होय ? या पोराने रातच्या वेळी डाका घालायचा नाही तर काय पोथी सांगायची होय ?"

येशाच्या आईने त्याला शाळेत घालायची खटपट चालविली, तेव्हा गेनूचे मस्तक फिरले. साऱ्या रात्रभर दारू पिऊन त्याने बायकोला खूप बडवले.

पोपडे वर आलेल्या जमिनीप्रमाणे तिचे अंग सुजून आले, तरी तिने आपला हट्ट सोडला नाही.

येशा दिवसा शाळेत जाऊ लागला आणि दिवसा चोरलेल्या अनेक वस्तू रात्री बापाला देऊ लागला. असे त्याचे दुहेरी शिक्षण चालले होते.

पुढे एके दिवशी गेनू तापाने आजारी पडून एकाएकी मरून गेला.

येशा आता चौदा वर्षांचा झाला होता. त्याची आई दोऱ्या वळी, बाज, पाळणे, विणून देई; वाळलेल्या काटक्या गोळा करून बाजारात विकून स्वतःचे आणि मुलाचे पोट भरी. फार कष्टात आणि गरिबीत ती दिवस काढीत होती. पण दुसऱ्याच्या फुटक्या मण्याला ती शिवत नव्हती. पोराने खिसेकापूपणा करू नये, म्हणून ती डोळ्यांत तेल घालून जपत होती. शाळेतून आल्यावर त्याच्या दप्तराची झडती घेतल्याशिवाय ती त्याला एक तुकडा सुद्धा गिळू देत नसे. तिने आपल्या गळ्याची शपथ त्याला हजारदा घालून ठेविली होती.

आईच्या शिकवणीने येशा आता खरोखर चांगला वागत होता. नादार विद्यार्थी म्हणून तो सहावीत शिकत होता. पण एके दिवशी संध्याकाळी, गावाबाहेर रस्त्यावरून एक पाच सहा वर्षांची मुलगी वाट चुकून एकटीच रडत चालली होती. येशा तिच्याजवळ गेला. चौकशी करून बिचारीला घरी पोहोचवावे असे त्याच्या मनात आले. पण तिच्या हातांतल्या दोन सोन्याच्या बांगड्या दिसताच त्याचे डोके फिरले. त्याला अवदसा आठवली. चलाखीने बांगड्या काढून त्याने त्या मुलीला तिच्या घराजवळ सोडून धूम ठोकली.

रात्री आई नेहमीप्रमाणे खंडोबापुढे भजन करू लागली. पत्र्याची चिमणी ढणढणत होती. धूर पसरला होता. तिच्या पायांशी फाटके पोते पसरून येशा पडला. त्याला झोप येईना. उद्या आईला कळले तर तिला काय वाटेल, या विचाराने त्याचा जीव खालीवर होत होता. येशा या कुशीवरचा त्या कुशीवर झाला. आईच्या आवाजातला दीनवाणा सूर ऐकून त्याच्या पोटात भडभडून आले. "अरेरे ! आई किती दुःखात दिवस काढते आहे आणि मी काय केले हे ! माझ्यामुळे बापाने तिला झोडपले. मी चोऱ्या करून तिची अब्रू घालवली, तरी तिने माया करून मला वाढवले आणि चांगले केले. उद्या तिला कळले तर तिच्या जिवाला काय वाटेल !"



एकाएकी उठून येशाने तिच्या पायाला घट्ट मिठी मारली. त्याच्या गालांवरून घळघळणारे थेंब पाहून ती मनात चरकली.

ओक्साबोक्शी रडत येशा म्हणत होता, “ आई, मी तुला फसवले. मी चोरी केली. एका मुलीच्या हातांतील सोन्याच्या बांगड्या चोरल्या. मी बापासारखा वाईट झालो ! तुझा मुलगा असून वाईट काम केले ! ”

येशाचा खुलासा ऐकून येशाच्या आईने आपली एकतारी डोक्यावर उंच उचलली. वाटेल ती शिक्षा भोगायला तयार होऊन येशाने खाली मान घातली.

आईच्या हातातील एकतारी एकाएकी गळून पडली. येशाला दोन्ही हातांनी धरून तिने त्याला वर उचलले. त्याच्या गालाला गाल लावून ती म्हणाली—

“ येशा, तू आपण होऊन खरे बोललास. आईशी खरे वागणारा साऱ्या जगाशी खरे वागतो. माझे काम झाले. आता साऱ्या जन्मात तुझ्या हातून

वाईट काम व्हायचेच नाही. आता तू आपण होऊन चांगला झालास. त्या बांगड्या त्या मुलीला परत देऊन ये. पुन्हा चोरी करू नकोस. चांगला अभ्यास कर आणि शहाणा हो." तिने त्याच्या डोक्यावरून हळूच हात फिरविला. येशाने मुसमुसत आपले डोके तिच्या मांडीवर एक वेळ घुसळले आणि तो लगेच झोपी गेला.

वंगाळ—वाईट. अवदसा आठवणे—वाईट बुद्धी सुचणे. डोळ्यांत तेल घालून जपणे—अतिशय काळजी घेणे. मुसमुसणे—हुंदके देऊन रडणे.

### अभ्यास

१. येशाच्या शिक्षणाबद्दल त्याच्या आईबापांना काय काय वाटे ?

२. येशाचे दुहेरी शिक्षण कोणते ?

३. येशाच्या हातून कोणकोणत्या चुका घडल्या ?

४. येशा सुधारला असे आईला कशावरून वाटले ?

५. वाक्यांत उपयोग करा :—
मस्तक फिरणे, मनात चरकणे, जीव खालीवर होणे.

६. "माझ्या हातून घडलेली चूक" यावर १० ओळी लिहा.

७. तुमच्या आईच्या थोरपणाची एक गोष्ट सांगा.

---

## १९. कोकिळराणी

कोकिळा : मी बाई कोकिळ वनची राणी
गाईन सुंदर गोड गाणी,
घुमतिल रानी सुस्वर माझे
म्हणतिल कोणी वीणा वाजे,
लपुन बसेन मी झाडांमध्ये
गाईन पंचम सुरांमध्ये.
येईल का कुणि पण ऐकायला
माझ्याशी रानात खेळायला ?
आली सरिता खळखळ बोलत
पर्वत-शिखरांवरून धावत

तुषार माणिकमोती उधळित.
सरिते, सरिते, पर्वतदुहिते—

सरिता : कोण बाई मज साद घालिते ?

कोकिळा : कोकिळराणी, मी वनराणी.

सरिता : काय ग म्हणतेस गायनराणी ?

कोकिळा : येतेस का ? आपण खेळू या खेळ.

सरिता : नको ग बाई, मला नाही वेळ
शेतांत पाणी द्यायचय ना,
झाडांना पाणी पाजायचय ना,
ओहोळांना पाणी पुरवायचय ना,
कोकिळराणी, तुम्ही तर आळशी
कोण हो खेळेल तुमच्यापाशी ?
( जाते. )

कोकिळा : आता काय करू ? कुणा हाक मारू ?
ही कोण आली सुळुक् सुळुक् !
अगबाई ही तर वाऱ्याची झुळुक !
वाऱ्यावर नाचते परी जशी !
हळूच फुंकर घालते कशी.
अग अग झुळुके, पवनाराणी—

झुळुक : काय ग म्हणतेस वसंतराणी ?

कोकिळा : येतेस माझ्याशी खेळायला ?

झुळुक : जाते मी मोठ्या कामाला.
झोपडीत जाईन खेड्यातल्या
बंगलित जाईन शहरातल्या.
देईन हवा अन् जगविन जीवा
साऱ्या जगाचा होइन विसावा

कोकिळराणी, तुम्ही तर आळशी
कोण हो खेळेल तुमच्यापाशी ?
( जाते. )

कोकिळा : आता काय करू ? कुणा हाक मारू ?
ही कोण आली अत्तर शिंपित,
चहुबाजूंला सुगंध पसरित ?
ही तर पुष्पा ! ए फुलराणी—

फुलराणी : काय ग म्हणतेस सुस्वरराणी ?

कोकिळा : येतेस का माझ्याशी खेळायला ?

फुलराणी : जातेय मी जग सुखवायला.
देवळात जाईन, सुवास देईन,
रोग्यांना हसविन, स्त्रियांस खुलविन.
कोकिळराणी, तुम्ही तर आळशी
कोण हो खेळेल तुमच्यापाशी ?
( जाते. )

कोकिळा : आता काय करू ? कुणा हाक मारू ?
पानांची सळसळ कानी आली.
नाचे फुलपाखरू पाकोळी,
नवरंगांची लेणी ल्याली.
ए पाकोळी, नर्तनराणी—

पाकोळी : काय ग म्हणतेस संगितराणी ?

कोकिळा : येतेस का माझ्याशी खेळायला ?

पाकोळी : काय ग झाले न यायला ?

कोकिळा : तुला काही आता काम नाही उरले ?

पाकोळी : छेः बाई ते तर कधीच सरले.

कोकिळा : अग अग पाकोळी, आता काय झाले !

पाकोळी : सांग ना मला, काय ग झाले ?
कोकिळा : सरिता, पुष्पा, झुळूक आल्या,
टोचुन, खोचुन मला म्हणाल्या,
'तुम्ही तर साऱ्या मुलखाच्या आळशी
कोण हो खेळेल तुमच्यापाशी ?'
पाकोळी : शिणले सारे दमून भागुन
हसविशि त्यांना गाणे गाउन.
काम संपले खेळू आता
नृत्य करिन मी मैत्रिण गाता.
वसंत येता आंबा डोले
कोकिळराणी मंजुळ बोले,
कुहू कुहू हे चाले कूजन
वसंत ऋतुचे स्वागत-गायन.
कोकिळा : फुलाफुलावर गिरकी मारुन
पाकोळी तू करिशी नर्तन.
दोघी : कुहू, कुहू, छुम्, छुम्, छुम् !
कुहू, कुहू, छुम्, छुम्, छुम् !

—सौ. लीलावती भागवत

सरिता—नदी. पर्वतदुहिता—पर्वताची मुलगी. साद घालणे—बोलावणे. कूजन—गाणे. लेणी—दागिने. नर्तन—नाच नाचणे. स्वागत-गायन—स्वागत करण्यासाठी गावयाचे गाणे. खुलविणे—आनंदित करणे.

## अभ्यास

१. कोकिळेला कोणकोण भेटले ? कोकिळेने सर्वांना कोणता प्रश्न विचारला ? त्यांनी कोणकोणती उत्तरे दिली ? कोकिळेनंतर जाण्यास कोण तयार झाले ? का ?
२. सरिता, झुळूक, फूल यांना कोणती कामे करावयाची होती ?
३. कोकिळेचे वर्णन कोणकोणत्या शब्दांनी केले आहे ? त्यांचा अर्थ लावा.
४. झुळूक, सरिता, फूल, पाकोळी यांची वर्णने करणारे शब्द कोणकोणते आहेत ? प्रत्येकी एक एक वाक्य लिहा.
५. शाळेच्या समारंभाच्या प्रसंगी हे संवाद-गीत करून दाखवा.

# २०. बाळू मुंबईस जातो

॥ श्री ॥

सदानंदवाडी,
गोखले रोड,
मुंबई २८.
१ मे १९६४.

तीर्थरूप सौभाग्यवती मातोश्रीस बालके बाळू याचा सप्रेम शिरसाष्टांग नमस्कार, विनंती विज्ञापना.

तुझा निरोप घेऊन मी ती० बाबांच्या बरोबर मुंबईस आलो. येथे पाहण्यासारखी ठिकाणे अनेक आहेत. ती पाहून फार मौज वाटली.

प्रथम आम्ही ज्या स्टेशनवर उतरलो त्याचे नाव बोरीबंदर. फार मोठे व गर्दीचे स्टेशन आहे हे ! आमची गाडी एका प्रचंड इमारतीतच शिरली. वर पत्र्याचे उंच अवाढव्य छप्पर. तेथे किती प्लॅटफॉर्म ! हमालांची आणि उतारूंची ही गर्दी ! जणू जत्राच. गर्दीत चुकेन म्हणून मी बाबांचा हात घट्ट धरून ठेवला होता.

तेथून आम्ही बसमधून फोर्टमध्ये गेलो. हा मुंबईचा सगळ्यात स्वच्छ, मोठमोठे रस्ते असलेला, वाहनांनी गजबजलेला भाग. त्यालाच कोट असेही म्हणतात. मोठमोठी दुकाने, बँका, विमा कंपन्या, कचेऱ्या मुंबईच्या या भागात आहेत. मधून मधून सुंदर पुतळे, शोभिवंत कारंजी व छोट्याशा बागाही दिसतात. आम्ही बसने त्या भागात गेलो होतो. काही बसगाड्या दुमजली आहेत. दहावीस पैशात मुंबईच्या एका भागातून दुसऱ्या भागात जाण्याची सोय या वाहनाने झालेली आहे. मी एका खिडकीशी बसून बाहेरची मौज पाहात होतो.

या भागात 'प्रिन्स ऑफ वेल्स' म्युझिअम आहे. हे एक मोठे पदार्थसंग्रहालय आहे. तेथील भव्य दिवाणखान्यातून मोठमोठी काचेची कपाटे आहेत. त्यांत शेकडो पशुपक्षी ठेविले आहेत. वाघ, सिंह इत्यादी प्राणी तेथे आहेत. अर्थात ते सर्व पेंढा भरलेले ! पण ते जणू जिवंतच आहेत असे वाटते. शिवाय किती तरी सुंदर चित्रे, पुतळे, जुन्या मूर्ती तेथे आहेत ! जुनी हत्यारे, नक्षीची भांडी, चिलखते, कपडे, सुंदर चित्रे तेथे मुद्दाम पाहाण्यासाठी ठेवली आहेत. राणीचा बाग म्हणून दुसरे एक असेच पदार्थ-संग्रहालय आहे. तेथेही अशा

काही प्रेक्षणीय वस्तू आहेत. शिवाय जिवंत पशुपक्ष्यांचा मोठा संग्रह तेथे प्रत्यक्ष पाहावयास मिळतो.

मुंबईच्या रस्त्यांतून लोकांची नेहमीच गर्दी असते. जो तो आपापल्या उद्योगात. इकडे तिकडे बघायला की बोलायला फुरसत नसते. सायंकाळी गिरणीमधून सुटणाऱ्या कामगारांची खूप गर्दी असते.

मुंबई हे एक प्रसिद्ध बंदर आहे. आगबोटीतून माल उतरून घेण्याच्या ठिकाणास गोदी असे म्हणतात. आगबोटींची तेथे नेहमीच गर्दी असते. माल उतरून घेण्यासाठी प्रचंड यंत्रे असतात. या यंत्रास यारी असे म्हणतात.



एका आगबोटीला पाच सहा मजले असतात. ते एक तऱ्हेचे गावच म्हणा ना! उतारूंच्या बोटीत सर्व प्रकारची सोय असते. गोदीमध्ये काही आगबोटींची दुरुस्ती चालली होती. तेथे बोटीचा पाण्याखालचा भाग किती मोठा असतो, ते पाहून आश्चर्य वाटते. गोदीच्या तळाशी बसून आगबोटीच्या खालच्या भागाची दुरुस्ती करणारा कामगार एखाद्या बाहुलीसारखा दिसत होता.

मुंबई हे जगातील एक मोठे शहर आहे. त्याचा विस्तार फार मोठा आहे. आगगाड्या, मोटारी, बसगाड्या, एक घोड्याच्या गाड्या ( व्हिक्टोरिया ) इत्यादी

वाहनांमुळे मुंबईतील कोणतेही ठिकाण फार दूर वाटत नाही. येथे व्यापाराच्या मोठमोठ्या पेठा व मालाच्या वखारी आहेत. एका जातीचा वाटेल तितका माल



येथे मिळू शकतो. एका ठिकाणी तेलाची हजारो पिंपे रचलेली, तर दुसरीकडे घराच्या उपयोगी असणाऱ्या खिडक्या, दरवाजे, जिने यांचा ढीग रचून ठेवलेला. मुंबईला मिळत नाही असे काही नाहीच ! येथील व्यापारी सर्व जिनसांचा व्यापार करून हजारो रुपयांची उलाढाल करतात. या ठिकाणची गर्दी पाहून मी तर भांबावूनच गेलो.

आम्ही ' हिंदुस्थानचे प्रवेशद्वार ' नावाचे एक ठिकाण पाहावयास गेलो होतो. तो एक प्रचंड कमानदार दरवाजा आहे. तेथे श्रीशिवाजी महाराजांचा एक भव्य पुतळा आहे. दरवाजासमोर समुद्र गर्जत असतो. तेथून समुद्राचा देखावा मजेदार दिसतो. आम्ही होडीत बसून समुद्रावरून



फिरून आलो. समुद्राचा विस्तार, जवळपास डोलणारी शिडांची जहाजे, दूर जात असलेले भारताचे प्रवेशद्वार, किनाऱ्यावरील इमारती आणि समुद्राच्या पलीकडे दिसणारा किनारा पाहून फार आनंद वाटला.

आम्ही येथील 'मलबार टेकडी' पाहण्यास गेलो होतो. वेळ सायंकाळची होती. चौपाटीच्या बाजूने येताना समोर समुद्र दिसत होता. टेकडीवर चढण्यासाठी सुंदर सडका आहेत.

टेकडीच्या उतरणीवर मनोहर बाग केली आहे. बाग किती सुंदर व रेखीव आहे ! जिकडे तिकडे स्वच्छता व टापटीप. बसायला आरामशीर बाके. पायाखाली सपाट कापलेली मऊमऊ हिरवळ. साधे कुंपण सुद्धा हिरवेगार व व्यवस्थित कापलेले. काही ठिकाणी त्यास सिंह, हत्ती, उंट, माकड, मोर असे विविध आकार दिलेले पाहून फारच कौतुक वाटले. या बागेला 'हँगिंग गार्डन' किंवा 'झुलती बाग' म्हणतात. पण ती हालत नाही. ती पाण्याच्या मोठ्या टाकीवर तयार केली आहे. पाण्याच्या खूपच मोठ्या हौदावर झाकण घालून व त्यावर सुमारे एक मीटर मातीचा थर देऊन ही बाग तयार केली आहे. आहे की नाही गंमत !

मी त्या बागेच्या कठड्यापाशी उभा राहिलो. सभोवारच्या मुंबईची नीट कल्पना आली. चोहोबाजूला समुद्रावर शिडांच्या होड्या डोलत होत्या. सायंकाळचा सूर्यास्ताचा देखावा मोठा रमणीय वाटला. तो पाहा गव्हर्नरांच्या बंगल्यावरील लाल दिवा ! ते कुलाब्याचे दीपगृह ! सायंकाळच्या प्रकाशात उंच डोके काढून उभा राहिलेला राजाबाई टॉवर ! खरोखर हा देखावा मी कधीच विसरणार नाही.




मुंबईच्या मुख्य मुख्य भागांचे हे थोडक्यात वर्णन केले आहे. किती लिहू व काय लिहू असे होते. स्वतः पाहिल्याशिवाय मुंबईची खरी शोभा कळावयाची नाही.

हेच पत्री ती० स्व० दादा व ती० स्व० ताई यांस साष्टांग नमस्कार. चि. गोपाळ यास सप्रेम आशीर्वाद. कळावे, हे विनंती.

तुझा लाडका,

बाळू

### अभ्यास

१. बाळूने मुंबईत कोणकोणती स्थळे पाहिली ?
२. बाळूने केलेल्या वर्णनावरून तुम्हांला मुंबईचे कोणते ठिकाण जास्त आवडते ? का ?
३. मुंबई हे खूप मोठे शहर आहे. मग बाळूने लांबलांबची ठिकाणे इतक्या थोड्या दिवसांत कशी पाहिली ?
४. ती०, स्व०, चि० हे शब्द संपूर्ण लिहा.
५. तुम्ही परगावाला गेला आहात असे समजून तेथून आईस पत्र लिहा.

---

## २१. बहीण–भाऊ

नीरा आज सकाळपासून अतिशय आनंदात होती. तिच्या भावाचे आज बारसे होते. मावशी, आजी यांची धांदल पाहून आपणही काहीतरी मदत करायला पाहिजे म्हणून उगाच ती साऱ्या घरभर हिंडत होती. मावशीजवळ तिने दूध प्यायलाही मागितले नव्हते. शेवटी मावशीनेच तिला हाक मारली.

" नीरा, दूध पितेस ना ? " मावशीने विचारले.

" अं हं, आता मी मोठी झाले. आता दूध बाळाला." नीरेने उत्तर दिले.

ते ऐकून मावशीला खुदकन हसू आले. तिने नीरेचे बोट धरले आणि दुधाचा कप तिच्यापुढे ठेवून ती म्हणाली, " त्याची नको तुला काळजी."

नीरा हळूच मावशीच्या पुढ्यात येऊन बसली आणि तिच्या गळ्याभोवती हात टाकीत लडिवाळपणे म्हणाली, " मावशी, कसा छान आहे ग आपला बाळ ! आता बाळाला म्हणायला गाणी शिकवशील ना मला ? "

" पाठ करणार असलीस तर शिकवते. हं, म्हण."

पालख पाळणा । मोत्यांनी विणीला
मामाने धाडिला । तान्ह्या बाळा ॥
अंथरूण केले । पांघरूण शेला
निजविते तुला । भाऊराया ॥
अंथरूण केले । जाई मोगऱ्याचे
सख्या गोजिऱ्याचे । अंग मऊ ॥

नीज रे बालका । आपल्या पालखी
तुला राखायाला । रघुनाथ ॥

नीरा दिवसभर ओव्या गुणगुणत होती. संध्याकाळचे पाच वाजले. नीरेच्या आईच्या मैत्रिणी जमल्या. रंगीत पाळणा फुलांच्या हारांनी सजविला. बाळाला पाळण्यात ठेविले. सर्वांना आनंद देणारा म्हणून बाळाचे नाव 'आनंद' ठेविले. पेढे वाटताना, बाळाला पाळण्यात घालताना नीरेची गडबड सुरू होतीच. मावशीने तिला झोका द्यायला सांगितले व मुद्दामच या ओव्या म्हटल्या—

रंगीत पाळणा । त्याला रेशमाची दोरी
हालविते गोरी । नीराताई ॥
रंगीत पाळणा । त्याला रेशमाचा दोर
हळू हळू झोका काढ । नीराताई ॥
रंगीत पाळणा । येता जाता हालवा
कोठे गेली ती बोलवा । नीराताई ॥

ओवीत आपले नाव येताच नीरेला मजा वाटली. बाळाला झोप लागेपर्यंत ती पाळणा हालवीत होती.

(२)

काही महिन्यांनी आनंदाही आपल्या बोबड्या बोलांनी नीरेला साथ देऊ लागला. आनंदा कधी रुसला किंवा कधी रडू लागला तर नीरा त्याला कडेवर घेऊन गाणे म्हणे—

माझ्या अंगणात । नाचते चिमणी
बाळाला खेळणी । देवाजीची ॥
माझ्या अंगणात । कावळा 'का का' करी
बाळाला हाका मारी । खेळायाला ॥
माझ्या ग अंगणात । सांडिला दूधभात
जेविला रघुनाथ । आंदुबाळ ॥

हे बहीण-भावाचे प्रेम पाहून आईला धन्यता वाटे.

आज कोजागरी पौर्णिमा होती. परसात झोपाळा बांधला होता. नीरेच्या मैत्रिणींना रात्री जागायला बोलाविले होते. नीरेच्या मैत्रिणी यमू, सखू, कमल, इंदू, गंगू साऱ्या जमल्या होत्या.

त्यांचे निरनिराळे खेळ खेळून झाले. आईने हाक मारून सांगितले, " नीरा, आता सर्वजणी झोपाळ्यावर बसून ओव्या म्हणा बरे. " मुलींनी आपल्या छोट्या भावंडांना झोपाळ्यावर बसवून ओव्या म्हणण्यास सुरुवात केली.



गंगूचा आवाज गोड होता. तिने प्रथम ओव्या म्हटल्या पाहिजेत असे ठरले. " आज बहीण-भावाच्याच ओव्या म्हणायच्या हं. " इंदूने सूचना केली.

माझा भाऊराया । सर्वांना हवा हवा<br>
आहे मथुरेचा खवा । भाऊराया ॥

दांडपट्टा खेळे । करी तरवारीचे हात<br>
घोडा नेई दौडवीत । भाऊराया ॥

माझा भाऊराया । मनी मी आठवीन
पोटात साठवीन । रात्रंदिन ॥

गंगूच्या ओव्या म्हणून संपल्या. सर्व मुली आता नीरेच्या पाठीमागे लागल्या. "नीरा, आता तू म्हण," साऱ्या म्हणाल्या.

नीरेनेही फार आढेवेढे घेतले नाहीत. आनंदाला जवळ घेऊन ती म्हणू लागली—

माझा भाऊराया । कसा का असेना
त्याच्यासाठी प्राणा । टाकीन मी ॥

भावाला पाहून । बहीण गहीवरे
डोळियांचे झरे । वाहताती ॥

संसारी कितीक । असती नातीगोती
मोलाची माणिकमोती । बहीण-भाऊ ॥

जन्मून जन्मून । संसारात यावे
प्रेम ते चाखावे । बहीण-भावाचे ॥

### अभ्यास

१. बाळाचे नाव आनंद का ठेवले ? "मला दूध नको," असे नीरा का म्हणाली ? भावासाठी बहीण काय काय करीत असे ?
२. कोजागरी पौर्णिमा कोणत्या महिन्यात येते ? त्या दिवशी नीरेच्या घरी काय काय झाले ?
३. गुणगुणणे, गहिवरणे, आढेवेढे घेणे यांचा वाक्यांत उपयोग करून दाखवा.
४. 'माझा भाऊ' व 'माझी बहीण' यावर प्रत्येकी १० वाक्ये लिहा.

---

## २२. देशभक्त बाबू गेनू

बाबू गेनू १९०८ साली जन्मला. त्याचे वडील ग्यानबा सैद हे गरीब शेतकरी होते. पुणे जिल्ह्यातील महाळुंगे गावात त्यांची थोडीशी वडिलोपार्जित शेती होती.

ग्यानबांनी बाबूचे नाव शाळेत घातले. शाळेत जाणे बाबूच्या नशिबी फार दिवस नव्हते. इ. स. १९१८ साली सगळीकडे तापाची भयंकर साथ सुरू

झाली. या साथीत त्याचे वडील वारले. बाबू त्या वेळी अवघा दहा वर्षांचा होता. त्याची बहीण, एक लहान भाऊ व बाबू अशा तिघांचा भार त्याच्या आईवर पडला.

पोटासाठी त्यांना आपला गाव सोडावा लागला. पनवेल, चिपळूण, वाई, अशा निरनिराळ्या गावी जाऊन त्याच्या आईला मजुरी करावी लागली. पुढे बाबूही मुंबईस जाऊन गिरणीत काम करू लागला.

याच वेळी सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली. महात्मा गांधींचे नाव सर्वांच्या तोंडी झाले. आपला देश स्वतंत्र झाला पाहिजे असे अनेकांना वाटू लागले. आपणही देशसेवा करावी, महात्मा गांधींच्या या मोठ्या कार्याला हातभार लावावा, असे बाबूला वाटू लागले.

बाबू काही फार शिकलेला नव्हता. तो लोकांपुढे काय व्याख्याने देणार ! तो मात्र स्वतः स्वदेशी वस्तूच वापरू लागला. शेजाऱ्यापाजाऱ्यांची मने स्वदेशीकडे वळवू लागला. स्वयंसेवक म्हणूनही काही काही वेळा तो काम करी. मिठाचा सत्याग्रह सुरू झाल्यावर त्याने आपले नाव तानाजी पथकात ताबडतोब नोंदले. वडाळा येथील सत्याग्रहात भाग घेतला. न्यायाधीश दस्तूर यांनी त्याला सक्त मजुरीची शिक्षा दिली. निकाल वाचल्यावर ते म्हणाले,—

" हे स्वयंसेवक परदेशी मालाच्या मोटारींपुढे का पडत नाहीत ? "

बाबूला या शब्दांची चीड आली. आपल्या देशाचा हा अपमान आहे, असे त्याला वाटले. त्याने मनातल्या मनात काही तरी निश्चय केला. परदेशी मालाच्या मोटारी अडवू व बहिष्काराचे काम यशस्वी करून दाखवू, असे विचार त्याच्या मनात घोळू लागले.

तुरुंगातून सुटून आल्याबरोबर तो गावी गेला. आईला फार आनंद झाला. सर्वांनाच त्याचे कौतुक वाटत होते. तो गावाहून परत मुंबईस आला तेव्हा परदेशी मालावरील ' बहिष्कार ' चळवळ जोरात सुरू होती.

बाबू बहिष्काराच्या स्वयंसेवक दलात सामील झाला. स्वयंसेवक दलही मोठे होते. बाजारात परदेशी कपडा नेऊच द्यायचा नाही, असा निश्चय करूनच रोज स्वयंसेवक बाहेर पडत.

एकदा बाबूला व त्याच्या सहकाऱ्यांना सुगावा लागला की, दामोदर खेतसी व कासम रहिमान हे व्यापारी विलायती कापड नेणार आहेत. ही गोष्ट १२ डिसेंबर

१९३० ची आहे. त्या दिवशी स्वयंसेवक या व्यापाऱ्यांना भेटले. स्वयंसेवकांनी त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण सारे पालथ्या घड्यावर पाणी! त्यांनी परदेशी मालाच्या मोटारी बाजारात पाठविण्याचा निश्चय केला.

"मग आम्हांला सत्याग्रह करून तुमच्या मोटारी अडवाव्या लागतील," बाबू शेटजींना म्हणाला. "पाहू या," शेटजी म्हणाले.

बाबू व त्याचे सहकारी तेथून जे निघाले ते सत्याग्रहाच्या तयारीनेच. शेटजींनी पोलिसांची मदत घेतली. मोटारीत सारे परदेशी कापड भरले. मोटारी तो कपडा घेऊन निघाल्या. त्याबरोबर एक स्वयंसेवक मोटारीपुढे आडवा पडला. पोलिसांनी त्याला जबरदस्तीने दूर केले. लगेच दुसरा स्वयंसेवक मोटारीपुढे आडवा पडला. त्याचीही तीच स्थिती. तिसऱ्या स्वयंसेवकाला अटकच केली व एवढ्या अवधीत एक मोटार तर निघून गेली.

बाबू दुरून हे सारे पाहात होता. आता रस्त्यावरचा पहारा अधिक कडक झाला. पोलीस कोणाला रस्त्यावर येऊ देईनात. इतक्यात दुसरी मोटार येताना दिसली. ती पण विलायती मालाने भरलेली होती. त्या मोटारीला अडविण्यासाठी श्री. पांडुरंग परब पुढे झाले. ते धावत जाऊन रस्त्यावर निजले. पण पोलिसांनी त्यांना उचलून बाजूला केले.



हे पाहून बाबूसह तीस स्वयंसेवक रस्त्यावर निजले. त्यांनाही पोलिसांनी खेचून बाहेर काढले. दुसऱ्या मोटारीचा मार्ग पण मोकळा झाला.

बाबूला हे पाहवेना. त्याचे रक्त सळसळले. एका निमिषात त्याने निश्चय केला आणि तो रस्त्याकडे तीरासारखा धावला. त्याच्या अंगात खूप उत्साह भरला होता. एका क्षणात तो रस्त्यावर गेला व मोटारीपुढे आडवा पडला.

हा बाबूच्या आयुष्याचा शेवटचा क्षण होता. मोटार त्याच्या अंगावरून गेली. स्वदेशीच्या प्रेमासाठी बाबूने आपला प्राणच अर्पण केला.

जमलेले लोक, पोलीस अधिकारी सगळे स्तंभितच झाले. रस्ता बाबूच्या रक्ताने माखला गेला. सारी मुंबई या प्रकाराने हादरली. अनेकांच्या मनात स्वदेशीची भावना निर्माण करणारा हा क्षण किती पवित्र ! आणि हा क्षण ज्याने पवित्र केला तो बाबू गेनू किती पुण्यवान ! किती स्वार्थत्यागी ! किती धैर्याचा !

साऱ्या मुंबईने बाबूचा सन्मान केला. स्वदेशीची ज्योत पेटविणाऱ्या बाबूच्या शवाला अनेकांनी पुष्पहार घातले. मुंबईतच नव्हे तर साऱ्या भारतात दुसऱ्या दिवशी एकच जयघोष होत होता—" बाबू गेनू झिंदाबाद ! "

मुंबईतला ' बाबू गेनू रस्ता ' बाबूच्या या थोर कार्याची आठवण करून देतो व स्वदेशावर प्रेम करायला शिकवितो. महाळुंगे येथील ' बाबू गेनू प्राथमिक शाळा ' आजही त्याची आठवण ताजी ठेवीत आहे.

वडिलोपार्जित—वाडवडिलांनी मिळविलेली. अवधी—वेळ. एका निमिषात—डोळ्याची पापणी लवते न लवते तोच. स्तंमित—चकित. पथक—तुकडी. शव—प्रेत.

## अभ्यास

१. देशासाठी प्राण अर्पण करायला बाबू गेनू का तयार झाला ? देशभक्त होण्यासाठी बाबूची कसकशी तयारी झाली ?
२. मोठा झाल्यावर त्याने कोणता मोठा स्वार्थत्याग केला ? बाबू गेनूची आठवण राहावी म्हणून लोकांनी काय केले ?
३. परदेशी मालावर बहिष्कार का घालावा ? न्यायाधीश दस्तूर यांच्या कोणत्या बोलण्याची बाबू गेनूला चीड आली ? का ?
४. वाक्यांत उपयोग करा :—पालथ्या घड्यावर पाणी, सुगावा लागणे, स्तंभित होणे, प्राण अर्पण करणे, बहिष्कार घालणे.

---

# २३. श्रावण बाळ

[ रामायणात श्रावणाची एक गोष्ट आहे. श्रावणाची आईवडिलांवर मोठी भक्ती होती. त्यांना कावडीत घालून तो काशीयात्रेला घेऊन जात होता. वाटेत जो भयंकर प्रसंग ओढवला तो या कवितेत वर्णन केला आहे. ]



शर आला तो, धावुनि आला काळ,
विव्हळला श्रावण बाळ.
' हा ! आई गे ! ' दीर्घ फोडुनी हाक,
तो पडला जाउन झोक.
ये राजाच्या श्रवणी करुणा वाणी,
हृदयाचे झाले पाणी.
त्या ब्राह्मणपुत्रा बघुनी
शोकाकुल झाला नृमणी,
आसवे आणुनी नयनी
तो वदला, ' हा हन्त ! तुझ्या नाशाला
मी पापी कारण बाळा ! '     १

मग कळवळुनी नृपास बोले बाळ,
'कशि तुम्ही साधिली वेळ!
मम म्हातारे मायबाप तान्हेले
तरुखाली असती बसले.





कावड त्यांची घेउन मी काशीला
चाललो तीर्थयात्रेला.
आणाया निर्मळ वारी
मी आलो या कासारी,
ही लगबग भरुनी झारी
जो परत फिरे, तो तुमचा शर आला
या उरात रुतुनी बसला. २

मी एकुलता पुत्र, कसा हा घाला
मजवरती अवचित आला!
त्यां वृद्धपणी मीच एक आधार
सेवेस अता मुकणार.

जा, बघतिल ते वाट पाखरावाणी
द्या नेउन आधी पाणी.
आहेत अंध ते दोन्ही,
दुर्वार्ता फोडु नका ही,
ही विनती तुमच्या पायी,
मजमाघारी करा तुम्ही सांभाळ
होउनिया श्रावण बाळ. ३

परि झाकुनि हे सत्य कसे राहील !
विधिलेख न होई फोल.
काळिज त्यांचे फाटुन शोकावेगे
ते येतिल माझ्यामागे,
घ्या झारी....मी जातो....'त्याचा बोल
लागला जावया खोल.
सोडिला श्वास शेवटला,
तो जीव-विहग फडफडला,
तनु-पंजर सोडुनि गेला,
दशरथ राजा रडला धायी धायी
अडखळला ठायी ठायी. ४

—ग. ह. पाटील

शर—बाण. शोकाकुल—दुःखाने व्याकुळ. नृमणी—राजा. नृप—राजा. वारी—पाणी. कासार—तलाव. दुर्वार्ता—वाईट बातमी. विधिलेख—नशिबात लिहिलेले. जीव-विहग—जीव हाच पक्षी. तनुपंजर—शरीर हाच पिंजरा. विनति—विनंती. हा हन्त !—हा हाय ! शोकावेग—अतिशय शोक.

## अभ्यास

१. श्रावणाला बाण लागला हे पाहून दशरथाला काय वाटले ?
२. श्रावणाला कशासाठी अतिशय दुःख होत होते ? त्याने दशरथाला कोणती कामगिरी सांगितली ?
३. आपल्या आईवडिलांविषयी श्रावण काय काय बोलला ? यावरून तुम्हांला त्याच्याबद्दल व त्याच्या आईवडिलांबद्दल काय विशेष समजून आले ?
४. श्रावणाची गोष्ट तुमच्या शब्दांत लिहा.

---

# २४. निरोप

" वळवाचा पाऊस । पडून ओसरला ।
भावाला झाल्या लेकी । मग बहीण विसरला ॥ "

शाळा सुटून बहुतेक मुली घरोघर गेल्या होत्या. पण काही जणी अजून पटांगणात खेळत होत्या. शेजारी उभ्या असलेल्या सरलाबाईंना अहिल्याबाई ही ओवी सांगत होत्या. शाळेच्या कामाविषयी आणखी काही तरी सांगणार इतक्यात आठदहा मुलींचा घोळका धावत धावत त्यांच्या भोवती गोळा झाला.

एक म्हणाली, " ताई, आम्ही एक ऐकले ते खरे का ? "

दुसरी म्हणाली, " दुसऱ्या गावच्या शाळेत तुमची बदली झाली. तुम्ही आठ दिवसांनी जाणार, असे या बाईंनीच सांगितले."

शेवंती म्हणाली, " हे हो काय ताई ! तुम्ही म्हणाला होता ना की, मी कधी तुम्हांला सोडून जायची नाही म्हणून." तिचे डोळे भरून आले. ती म्हणाली, " आम्ही नाही तुम्हांला जाऊ देणार. नाही तर आम्हा सगळ्यांनाच नवीन शाळेत घेऊन जा. विसराल तुम्ही आम्हांला."

अहिल्याबाई म्हणाल्या, " मला गेले तर पाहिजेच. तुम्ही मात्र मला विसरू नका म्हणजे झाले."

" ताई, मी तुम्हांला जन्मात विसरणार नाही," असे शेवंती म्हणाली. आणि खरोखरच मुसमुसू लागली. तिला जवळ घेऊन कुरवाळीत अहिल्याबाई मुलींना म्हणाल्या, " तुम्ही दुसऱ्या वर्गात जाल. नवीन शिक्षिका येतील. नवीन मैत्रिणी मिळतील. मग माझी आठवण थोडी कमी होईल, नाही का ? "

" नाही बाई, नाही बाई ! आम्ही तुम्हांला विसरणे शक्य नाही." सगळ्या मुली एक सुराने जोरात म्हणाल्या.

अहिल्याबाई संथपणे म्हणाल्या, " मग तुमची लग्ने होतील." " इश्श ! अय्या ! आम्ही नाही बाई ! " पुन्हा मुली ओरडल्या.

ताईंनी बोलणे चालूच ठेविले, " नाही कसे ? मोठ्या झाल्यावरची गोष्ट सांगते आहे मी. मग तुम्हांला माझी आठवण करायला वेळ कोठून मिळणार ? घरकाम करताना, लहान मुले खेळवताना एखाद्या वेळेला तुम्ही म्हणाल, " अहिल्याबाई ? कोण बरे ? हो, होत्या वाटते आमच्या शाळेत एक बाई ! "

मुलींचे लागोपाठ शब्द निघू लागले. " असे हो काय, आम्ही असे कधी करणार नाही." " बाई, मी तर लग्नच करणार नाही. या शाळेत मी तुमच्यासारखीच शिकवणार ! " अहिल्याबाईंनी हसून मुलींचा निरोप घेतला. त्यांच्याबरोबर मुलीही निघाल्या. वाटेत शेवंतीच्या घरी तिला पोचवून बाई पुढे गेल्या.

मुलींनी अहिल्याबाईंना निरोप देण्याचा समारंभ करावयाचे ठरविले. मोठ्या विद्यार्थिनींनी व शिक्षिकांनी मिळून, आठवण म्हणून एक फुलदाणी द्यावयाचे ठरविले आहे, याची कुणकूण ताईंना लागली. तेव्हा त्यांनी वर्गातील मुलींना बोलावून सांगितले, " तुम्ही मला जर काही देणार असाल, तर त्यासाठी घरून पैसे मागून आणावयाचे नाहीत. तुम्ही स्वतः जे काही कराल, मिळवाल, गोळा कराल, ते मला दिले, तर मला आनंद होईल. "

समारंभाची तयारी आठवडाभर उत्साहाने जोरात चालली होती. आज संध्याकाळी शाळा सुटल्यावर समोरच्या पटांगणात उंच झाडांच्या सावलीत निरोप-समारंभ होता. मुली अर्धे रिंगण करून बसल्या होत्या. समोर एका ओळीत ताई, इतर शिक्षक व शिक्षिका बसल्या होत्या.

दुपारपासून उकाडा वाढतच होता. आता आभाळ ढगांनी भरून आले. सूर्य झाकून गेला आणि एकंदर उदास छाया पसरली. पण मुलींची भाषणे थांबेनात. ताई विषय सोपा करून शिकवीत, हे कोणी सांगितले, ताई स्वतः स्वयंपाक करतात म्हणून मी सुद्धा घरी स्वयंपाक करू लागले, असे दुसरी म्हणाली. आम्हांला ताई आवडतात म्हणून आम्ही त्यांना फुले-वेण्या आणतो. आमचा दुसऱ्या वर्गातील मुलींना हेवा वाटतो, असे तिसरी म्हणाली. आम्ही तर अहिल्यादेवीच म्हणणार होतो, पण ताईंना ते आवडले नाही; इतक्या ताई साध्या

आहेत, असे चौथीने सांगितले.

शेवटी शेवंती बोलावयास उभी राहिली. ती म्हणाली, "मी पोरकी लहान पोर. मला ताईंनी आईसारखे सांभाळले. काय बोलावे आणि काय द्यावे, तेच मला सुचत नाही. मला तर वाईट वाटतेच; पण पाहा; सूर्याला, वाऱ्याला आणि ढगाला सुद्धा वाईट वाटते आहे ताई जाणार म्हणून."

सर्वांनी वर पाहिले. मळकट सदऱ्यासारख्या दिसणाऱ्या ढगात सूर्याने तोंड लपविले होते. हट्टी मुलासारखा वारा जमिनीवर गडबडा लोळण घेत होता आणि चिडून झाडांच्या फांद्या हालवीत होता. ढग घसा फोडून ओरडू लागले. शेवंतीचे डोळे भरून आले. ढगांच्या डोळ्यांतील आसवे सुद्धा आभाळातून टपटप ओघळू लागली. पण हे पाण्याचे साधे थेंब नव्हते. चांगल्या बोराएवढ्या, सुपारीएवढ्या गारा पटापट पडू लागल्या. जमिनीवरून तडतड उडू लागल्या.

'वळवांचा पाऊस, गारांचा पाऊस!' मुली आनंदाने ओरडत, नाचत, पावसात भिजत गारा वेचू लागल्या. समारंभाचा सगळ्यांना थोडा वेळ विसर पडला.

तासाभराने आकाश निवळून ऊन पडले. मध्ये खंड पडलेला समारंभ शाळेच्या पडवीत चालू झाला. बाईंनी सांगितल्याप्रमाणे लहान मुलींनी स्वतः केलेली पुठ्ठ्याची कामे, कागदाची कातरकामे, फुलांच्या वेण्या असे पदार्थ दिले. एकीने बकुळीची माळ देऊन म्हटले, "ताई, या फुलांच्या वासासारखी आमची आठवण तुमच्या जवळ पुष्कळ दिवस टिको!"

ताई इकडे तिकडे पाहात होत्या. त्या म्हणाल्या, "पण शेवंती कोठे गेली? ती मला काय देणार आहे?" हातातला जिन्नस रुमालाखाली झाकून दाराआड अर्धवट लपलेली अशी शेवंती उभी होती. तिने लाजत पुढे येऊन रुमालाने झाकलेली वाटी ताईंच्या हातात दिली.

ताईंनी रुमाल बाजूला करून वाटीकडे क्षणभर आश्चर्याने पाहिले. मुलींकडे वळून हसतमुखाने त्या हळू हळू म्हणाल्या—

"मुलींनो, शेवंतीने मला अपूर्व नजराणा दिला आहे. असा अजूनपर्यंत कोणी कोणाला दिला नसेल. घरी काही मागू नका, असे मी बजावले; पण देवाने दिलेले देऊ नका असे मी कोठे म्हटले होते? तुम्ही मुले ही घरची हिरेमोती आणि देवाची लाडकी फुले. या गारा देवाने पावसातून पाठविलेली मोती आणि फुले. ही शेवंतीने वेचून माझ्यासाठी आणली आहेत. गारा गोळा करून त्रास झाला, म्हणून

एकदोनच शिल्लक राहिल्या. पण बाकीच्यांचे कसे थंडगार स्वच्छ पाणी झाले आहे.

"वळवाचा पाऊस पडून ओसरला. तुमचे माझ्यावरचे प्रेम वळवाच्या पावसासारखे जोरदार आहे. गारांसारखे नाजूक आणि सुंदर आहे. पाऊस ओसरला. गारा वितळल्या. भाऊ बहिणीला विसरला, ही ओवी मी म्हटली तेव्हा तुम्ही रागावला. बरोबर आहे तुमचे म्हणणे. शेवंतीच्या पेल्यात थंड, स्वच्छ पाणी उरले आहे. तशी माझी थोडीशी आठवण तिच्या आणि तुमच्या मनात पुढे राहिली तरी मला पुरे.

"एका कवीने नवीन रचलेल्या ओव्या आता आठवल्या, त्या म्हणून आपण आजचा समारंभ संपवू—

वळवाचा पाऊस । पडून ओसरला ।
गेली जमीन झाकून । सडा गारांचा ग झाला ॥

ऊन तापता फिरून । गेल्या गारा वितळून ।
ओंजळीत गार पाणी । कशी जाऊ विसरून ॥"

## अभ्यास

१. मुली बाईंना का 'निरोप' देत होत्या ? त्यासाठी त्यांनी कोणकोणती तयारी केली होती ?

२. मुलींनी बाईंबद्दल काय काय सांगितले ? बाईंनी आपल्या भाषणात कोणती महत्त्वाची गोष्ट सांगितली ?

३. धड्यातील शेवटल्या ओव्यांचा अर्थ सांगा.

४. शेवंतीच्या नजराण्यात विशेष काय होते ?

५. तुमच्या वर्गातील मुलगा परगावी शिकावयास जात आहे, असे समजा. त्याला निरोप देण्यासाठी तुम्ही काय काय कराल ?

---

# २५. आपले निशाण



> “ चढवू गगनि निशाण,
> अपुले, चढवू गगनि निशाण.
> कोटि मुखांनी गर्जू,
> ‘ जय जय स्वतंत्र हिंदुस्थान ’ ! ”

होय, आपले निशाण ! आपल्या देशाचे निशाण ! आपल्या प्रिय भारताचे निशाण ! भारतात राहणारा तो भारतीय. ज्याला ज्याला ‘ मी भारतीय आहे,’ असा अभिमान वाटतो त्या प्रत्येकाचे निशाण. हिंदू, मुसलमान, शीख, पारशी, खिस्ती या सर्व भारतीयांचे निशाण.

आपले निशाण म्हणजे जणू भारतच ! परमेश्वर सगळीकडे भरून राहिलेला आहे. पण आपण त्याची मूर्ती बनवितो. त्या मूर्तीतच देव आहे असे मानतो.

त्याची पूजा करतो. आपला भारतही विशाल आहे. पण तो सारा या निशाणाच्या रूपाने आपल्यापुढे उभा राहतो. या निशाणाला मुजरा म्हणजेच आपल्या भारताला नमस्कार.

आपला झेंडा तिरंगी आहे. त्याचे आजचे स्वरूप त्याला १४ ऑगस्ट १९४७ च्या मध्यरात्री मिळाले. हा त्याचा नवा जन्मच जणू ! आपला भारत स्वतंत्र व्हावा, स्वतंत्र भारताचे निशाण जन्माला यावे, म्हणून कित्येकांनी आपले प्राण खर्ची घातले. हजारो स्त्रीपुरुष तुरुंगात गेले. अनेक काळ्या पाण्यावर गेले. काही फासावर लटकले. कोवळ्या कोवळ्या मुलांनी छातीवर गोळ्या झेलल्या. लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस अशा थोर थोर व्यक्तींनी आपले जीवन याच कार्यासाठी वाहिले. आपले निशाण त्यांच्या शिकवणीची सदैव आठवण करून देते. त्यांची शिकवण तरी किती थोर ! सारे सुखी तर आपण सुखी. एकाचे दुःख ते साऱ्यांचेच दुःख. आपण सारे एक आहोत, भारतमातेची लेकरे आहोत. आपणा साऱ्यांचे एकच निशाण.

होय, आम्हा भारतीयांचे एकच निशाण. आकाशात डौलाने फडकताना ते पाहिले म्हणजे हृदय कसे अभिमानाने भरून येते ! आदराने मस्तक नम्र होते आणि वाटते, आपले निशाण किती सुंदर ! किती प्रसन्न ! केशरी, पांढरा व हिरवा हे तिन्ही रंग त्याला किती खुलून दिसतात ! आणि मधोमध असलेल्या अशोकचक्राने तर बहारच केली आहे. त्याकडे पाहात राहिले तर वाटते की, जणू ते निशाण बोलतच आहे !

होय, आपले निशाण आपल्याशी बोलत आहे. आपला इतिहास सांगत आहे. तो केशरी रंग म्हणजे तांबडा रंग व भगवा रंग यांचे मिश्रण. लाखो लोकांनी सांडलेल्या रक्ताचीच जणू तो आठवण करून देतो. तो म्हणतो, “ मनाने निर्भय व्हा. या थोर लोकांची आठवण ठेवा. यांच्यासारखा देशासाठी त्याग करायला शिका.”

पांढरा रंग तर सुंदरच. तो कापरासारखा निर्मळ आणि जाईजुईसारखा कोमल व शांत. तो जणू कानांत सांगतो, “ माझ्यासारखे निर्मळ व्हा. प्रसन्न व्हा. कोमल व्हा. ”

आणि हा हिरवा रंग. सदा न् कदा हसतमुख असणाऱ्या हिरवळीसारखा. हिरवळ कधी मरत नाही. जरा ओल मिळाली की, झाली तरतरीत आणि

हिरवीगार ! हा हिरवा रंग म्हणतो, "तुम्ही सदा हसतमुख राहा. कष्ट पडतील, अनेक संकटे येतील, पण चिकाटी सोडू नका."

आणि ते अशोकचक्र. ते दिसले की, भगवान श्रीकृष्णाच्या सुदर्शनचक्राची आठवण होते. महात्मा गांधींचा आवडता चरखा डोळ्यांपुढे उभा राहतो. अशोक चक्र म्हणजे धर्मचक्र. ते सांगते, "सत्याने वागा, प्रेमाने वागा. यांतच खरा धर्म आहे." सगळ्यांना सुखी करणे मोठे कठीण आहे. पण आपले निशाण हे सामर्थ्य आपल्याला देईल. जग जर धर्माने वागले तर सगळ्यांना सुख मिळेल. सगळ्यांच्या सुखाचा विचार करायला मोठे सामर्थ्य लागते. आपले निशाण असे सामर्थ्य देईल.

होय, आपले निशाण सगळ्यांसाठी झटण्याचे सामर्थ्य आपल्याला देईल. त्यावर आपली श्रद्धा मात्र पाहिजे. देव पावतो, पण भाव ठेवून काम करील त्याला. आपल्या निशाणावर भाव ठेवून हाती चांगली कामे घ्या, ती निश्चित तडीस जातील.

आपले निशाण म्हणजे आपला प्राणच ! मग त्याचा मान नको का राखायला ? त्याला शिस्तीत नको का वंदन करायला ? त्याची हेळसांड करणाऱ्याला शांतपणे पण धिटाईने नको का समजावून सांगायला ? आपले निशाण म्हणजे जणू आपल्या भारताचा प्राणच ! त्याचा आदर राखण्यात किंचितही हलगर्जीपणा चालेल का ? म्हणून साऱ्याच भारतीयांनी म्हणायला पाहिजे—

**"चढवू गगनि निशाण, अपुले, चढवू गगनि निशाण.**
**कोटि मुखांनी गर्जू, जय जय स्वतंत्र हिंदुस्थान !"**

**जय हिंद !**



हेळसांड—दुर्लक्ष. प्राण खर्ची घालणे—मरायला तयार होणे. तडीस जाणे—पूर्ण होणे.

## अभ्यास

१. ' आपले निशाण ' म्हणजे कोणाकोणाचे निशाण ?

२. आपल्या निशाणाचा जन्म कधी झाला ? त्याच्यासाठी काय काय करावे लागले ?

३. आपल्या निशाणाकडे पाहून काय काय वाटते ? ते निशाण आपल्याला काय काय सांगते ? त्यावरील रंग व चक्र यांपासून आपण काय शिकावयाचे ?

४. " आपले निशाण म्हणजे आपला प्राणच, " याचा अर्थ समजावून घ्या.

५. निशाणाचा मान कसा राखावा ?

६. आपल्या झेंड्याची गाणी मिळवा व झेंडावंदनाच्या वेळी सर्वांनी मिळून म्हणा.

---

# २६. हरणांनो, पाडसांनो—

[ जंगलात काम करणारे लोक करमणुकीसाठी फेर धरून गाणी म्हणतात. असेच हे एक गाणे आहे. रानात हरणे सबंध रात्रभर काय काय करतात व कशी घाबरतात याचे वर्णन या कवितेत आले आहे. ]



खुजबुज खुजबुज खुजबुज खुजबुज
खुजबुज खुजबुज खुजबुज रे.
चंदनाच्या झाडाखाली पान का वाजे ?
चंदनाच्या झाडाखाली आल्या सावल्या
दिवसाच्या उन्हाने त्या होत्या कावल्या,
नका धावू, नका पळू,
जमा जमा हळू हळू,
नका देऊ कोणा कळू,
हरणांनो, पाडसांनो, कळपात या,
पाय नका वाजवू रे, कडे करा, या. १

भुसभुस फुसफुस भुसभुस फुसफुस
भुसभुस फुसफुस भुसभुस रे.
चंदनाच्या झाडाखाली माती का गळे ?
चंदनाच्या झाडाखाली रात निजली,
जागल्याच्या झोपडीत बत्ती विझली,
पान वाजे खुसूखुसू,
माती गळे भुसूभुसू
ससा करी फुसूफुसू
हरणांनो, पाडसांनो, कोंडीत शिरा,
हरणांनो, हरिणींनो, पहारा करा. २

लुकलुक टुकटुक लुकलुक टुकटुक
लुकलुक टुकटुक लुकलुक रे.
चंदनाच्या झाडावरी काय लकाके ?
चंदनाच्या झाडावरी उतरे परी,
काजव्यांना चांदण्यांना नाचते करी.
फूलकळी पान पान
उजळले सारे रान,
कशी मजा छान छान !
हरणांनो, पाडसांनो, बघा रे बघा,
पारध्याला हिव आले, आज न दगा. ३

कुजबुज कुजबुज कुजबुज कुजबुज
कुजबुज कुजबुज कुजबुज रे.
चंदनाच्या झाडातून कोण गातसे ?
चंदनाच्या झाडातून रातकिडे रे
घुमविती कलगी नी डहाळ्या डिरे,

किर्र किर्र कीण कीण
छूम छूम झन झन
टवकारा तुमचे कान,
काळविटा, नको रोखू शिंग उभारू,
नको सोडू रवंथाला बैठक मारू. ४

किलबिल चिवचिव किलबिल चिवचिव
किलबिल चिवचिव किलबिल रे.
चंदनाच्या झाडामागे कोण उगवे ?
चंदनाच्या झाडामागे चंद्रचकोर
पालवीत तांब फुटे, उठे सुकीर,
जागे झाले शेतमळे
जागे झाले तळे खळे
उभे पीक सळसळे,
पाडसांनो, हरणांनो, काळविटांनो,
पाखरांनो, कोकरांनो, शेतकऱ्यांनो.... ५

— र. वा. दिघे

कावल्या—त्रासल्या. लकाके—चकाकते. कलगी—फुलांचा झुपका. डिरे—फांदीच्या टोकांवरील कोवळे कोंब. तांब फुटणे—पहाट होणे. सुकीर—शुक्र तारा. कान टवकारणे—ऐकण्यास उत्सुक होणे. नाचते करणे—नाचावयास लावणे.

## अभ्यास

१. हरणांना कशाकशाची मौज वाटते ? का ?
२. हरणांना काय काय करायला सांगितले ? का ?
३. हरणांना भीती कोणाची वाटत होती ? कोणत्या ओळीत हे वर्णन केले आहे ?
४. पहाट झाली हे हरणांना कसे समजले याचे वर्णन करणाऱ्या ओळी शोधा.
५. या कवितेत निरनिराळे आवाज ऐकू येत आहेत, ते कोणते व कोणाचे ?

———

# २७. दांडी-यात्रा



सकाळची वेळ होती. गांधीजींकडे मुले आली होती. गांधीजींनी चरखा सुरू केला व ते मुलांना म्हणाले, " आज तुम्हांला दांडी-यात्रेची हकीकत सांगणार आहे. "

" मी महादेवभाईंना सांगितले की, अहमदाबादेपासून समुद्रापर्यंत जास्तीत जास्त लांबीची व पुष्कळशी शहरे लागतील असा पायी यात्रेचा नकाशा काढून आणा. दोनतीन दिवसांत तसा नकाशा तयार झाला. रोज दहा मैल पायी यात्रा करण्याचे ठरले. सकाळी निघून पाच मैलांवर मुक्काम करावयाचा. तेथे जेवण करून विश्रांती घ्यावयाची, दुपारी चार वाजता निघून पाच मैल चालावयाचे व रात्रीच्या

मुक्कामाला दुसऱ्या गावी जावयाचे असे ठरले. मी मनाशी संकल्प केला की, स्वराज्य मिळविल्याशिवाय आश्रमात परत राहावयास यावयाचे नाही. आमच्या पायी यात्रेत एकोणऐंशी स्वयंसेवक घेण्याचे ठरले. त्यांतले बहुतेक आश्रमवासी होते. दांडी या गावी शेवटचा मुक्काम करून तेथे मी मिठाचा सत्याग्रह प्रथम करावयाचा, तेथपर्यंत कोणीही कायदेभंग करावयाचा नाही, असे ठरले होते. ता. ११ मार्च १९३० रोजी आम्ही यात्रेला निघून व ५ एप्रिलला दांडीला पोहोचून ६ एप्रिलला सकाळी मिठाचा कायदेभंग करणार होतो.

" हिंदुस्थानातीलच नव्हे तर साऱ्या जगातील बातमीदार ही यात्रा पाहण्यास आले होते. एकीकडे इंग्रज सरकारच्या साम्राज्याचे सारे सामर्थ्य आणि एकीकडे निःशस्त्र असे हिंदी लोक—असा हा लढा होणार होता. प्रत्येक स्वयंसेवकाने आपले आंथरूण-पांघरूण, ताटवाटी, लोटा व कपडे बरोबर घ्यावयाचे होते. "

" बापूजी, तुम्हीही आपले आंथरूण-पांघरूण बरोबरच घेऊन चालत गेला काय ? " गौरीने आश्चर्याने विचारले.

" गौरी, त्या वेळी मी सारा साठ वर्षांचा होतो. माझे स्नेही म्हणत होते की, मी घोड्यावर बसून जावे. पण मला चालण्याची हिंमत होती. आम्हांला पोहोचविण्यास हजारो लोक जमा झाले होते. स्त्रियांनी स्वयंसेवकांना ओवाळून कुंकुमतिलक लावले. "

वासुदेव म्हणाला, " राम वनवासाला गेल्यावर अयोध्येतील लोकांस वाटले तसे आश्रमातील मागे राहिलेल्यांना उदास वाटले असेल. कारण तुम्ही परत फिरणार नव्हता. "

" होय, पुष्कळांना फार वाईट वाटले असेल. स्त्रिया खूप रडत होत्या. "

" बापू, तुम्हांला कधी रडायला येत नाही का ? " धीट सीतेने प्रश्न विचारला.

" अग सीता, मला रडू येत नाही असे कसे होईल ? मी पुष्कळदा रडतो. पण कर्तव्याच्या वेळी माझे मन बर्फाप्रमाणे घट्ट होते. माझे मन जेव्हा दुबळे बनून कर्तव्य करीत नाही, त्या वेळी मला रडू येते.

" प्रार्थना करून आम्ही आश्रम सोडला. मजबरोबर एकोणऐंशी लोक सैनिकांप्रमाणे जोडीजोडीने चालत होते. पाच मैल गेल्यावर पहिला मुक्काम झाला. तेथे सूतकताई, व्याख्यान व भोजन करून विश्रांती घेतली आणि सायंकाळी आम्ही पुढच्या गावाला गेलो. गावोगावचे लोक आमची सर्व व्यवस्था करीत होते.

“ आमच्या यात्रेची वर्णने वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होऊ लागल्यावर प्रत्येक मुक्कामावर हजारो लोक जमा होऊ लागले. वाटेतही पुष्कळ लोक भेटून जात.



“ आम्ही असा प्रवास करीत ५ एप्रिलला दांडीला पोहोचलो. दांडी हे अगदी लहान खेडे आहे. तेथे हजारो लोकांची राहण्याजेवण्याची सोय होणार नाही असे लोकांना वर्तमानपत्रांतून कळविले होते, तरी हजारो लोक जमा झाले होते. सकाळी उठून आम्ही स्नाने, प्रार्थना केली व समुद्रस्नानास सकाळी बरोबर सहा वाजता निघालो. स्नानानंतर परमेश्वरास स्मरून मी सत्याग्रहाला तयार झालो. सर्व लोक श्वास थांबवून शांतपणाने पाहात होते. मग अगदी मनाचा निश्चय करून मी सरकारी मालकीचे मीठ मूठभर उचलून प्रथम कायदेभंग केला. यानंतर स्वयंसेवकांनी कायदेभंग केला. सर्वत्र गजर झाला, भारतमाता की जय ! स्वातंत्र्याचा जयजयकार !

“ ता. ५ एप्रिलपर्यंत सर्व हिंदुस्थान युद्धाला तयार झाला होता. या युद्धाचा मी सेनापती होतो. म्हणून मी असा हुकूम काढला होता की, ‘ ठिकठिकाणी लोकांनी समुद्राच्या पाण्याचे किंवा खाऱ्या मातीचे मीठ करावे. ज्यांना ते जमणार नाही, त्यांनी हे बेकायदा मीठ कर न देता विकावे. ’

" दांडीचा कार्यक्रम संपल्यानंतर मी माझ्या निवडक स्वयंसेवकांना निरनिराळ्या गावी प्रचारासाठी पाठवून दिले. मीही ठिकठिकाणी जाऊन कायदेभंगाच्या चळवळीचा प्रचार करीत होतो. हिंदुस्थानभर कायदेभंग होऊन प्रथम मोठमोठाले पुढारी पकडले गेले. सरकारने दडपशाहीस सुरुवात केली. "

" बापू, तुम्हांला त्या वेळी किती शिक्षा झाली होती ? " दयाबाईने विचारले.

" माझ्यावर इंग्रज सरकारने त्या वेळी फिर्याद केली नाही; मला नुसते नजरकैदेत ठेविले. इंग्रज सरकारला समेट करावयाचा होता, पण स्वराज्य काही द्यावयाचे नव्हते. म्हणून त्यांनी काँग्रेसचे पुढारी तुरुंगातून सोडून दिले व आम्हांला चर्चेला दिल्लीस बोलाविले. पण लोकांना तसेच तुरुंगात ठेविले.

" यानंतरच सरकार व काँग्रेस यांच्यात तह झाला. सरकारने सर्व सत्याग्रही सोडले व डोक्यावरून नेता येईल तितके मीठ, कराशिवाय न्यावयास सवलत दिली. "

" मग बापूजी, एवढा मोठा लढा करून आपण काय मिळविले ? " गोपाळ म्हणाला.

" या लढ्यामुळे आमच्या लोकांचे धैर्य वाढले. लाठीची भीती गेली. तुरुंगाला तर कोणीच भीत नाहीसा झाला. याच बळावर आम्ही स्वातंत्र्याचे पुढचे लढे दिले. "

संकल्प करणे—बेत करणे. सामर्थ्य—शक्ती. निःशस्त्र—शस्त्र नसलेले.

## अभ्यास

१. दांडी यात्रा कशासाठी केली होती ? त्या यात्रेसाठी काय काय तयारी करावी लागली ?

२. सीतेने बापूजींना कोणता प्रश्न विचारला ? त्यांनी कोणते उत्तर दिले ?

३. दांडी-यात्रेचे सेनापती कोण होते ? त्यांनी कोणते हुकूम सोडले ?

४. दांडी-यात्रेमुळे कोणता मोठा फायदा झाला ?

५. ' बापूजींच्या गोड गोष्टी ' वाचा. एक गोष्ट थोडक्यात सांगा.

---

## २८. सृष्टीचे सौंदर्य

[ आपल्या भारतात निरनिराळ्या महिन्यांत कोणते सृष्टिसौंदर्य दिसते, ते या कवितेत सांगितले आहे. ]

भारती सृष्टीचे सौंदर्य खेळे,
दावीत सतत रूप आगळे ।।
वसंत वनात जनात हासे,
सृष्टिदेवी जणू नाचे उल्हासे. ।।१।।

गातात संगीत पृथ्वीचे भाट,
चैत्र-वैशाखाचा ऐसा हा थाट. ।।
ज्येष्ठ-आषाढांत मेघांची दाटी,
कडाडे चपला, होतसे वृष्टी. ।।२।।

घालाया सृष्टीला मंगल स्नान,
पूर अमृताचा सांडे वरून; ।।
गगनी नर्तन कृष्ण मेघांचे,
भूतली मयूर उत्तान नाचे. ।।३।।

श्रावणी पाऊस हास्याचा पडे,
श्रीकृष्ण-जन्माची दंगल उडे ।।
बांधिती वृक्षांना रम्य हिंदोळे
कामिनी, धरणी वैभवी लोळे. ।।४।।

— **शांताराम आठवले**

आगळे—निराळेच. उल्हासे—आनंदाने. भाट—स्तुती गाणारे. चपला—वीज. वृष्टी—पाऊस. नर्तन—नाच. उत्तान—अतिशय आनंदाने. रम्य—मनोहर. हिंदोळे—झोके. कामिनी—स्त्रिया. धरणी—पृथ्वी.

## अभ्यास

१. वसंत ऋतूत सृष्टीत कोणता बदल झालेला दिसतो? ज्येष्ठ, आषाढ या महिन्यांत आकाशात कोणते देखावे दिसतात?

२. श्रावण महिन्याचे वर्णन कोणत्या ओळीत आले आहे? आश्विन व कार्तिक महिन्यांत कोणते सण येतात? त्या वेळी लोक कोणकोणते खेळ खेळतात?

३. पृथ्वीचे भाट, मंगल स्नान, अमृताचा पूर व हास्याचा पाऊस हे शब्द आलेल्या ओळी वाचा.

---

# २९. अजिंक्य वसुमती

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट. लोहमंडळाचा राजा बलसागर बेचैन होऊन आपल्या महालात येरझारा घालीत होता. त्याने द्वारपालाला हाक मारून विचारले, "सेनापतींना बोलावणे पाठवून किती वेळ झाला? अजून कसे आले नाहीत ते?"

द्वारपाल हात जोडून म्हणाला, "परवाच जिंकून मांडलीक केलेल्या राजाचा नजराणा महाराजांना सादर करण्यासाठी ते येत आहेत."

सेनापतींनी नजराणा चौरंगावर ठेवला आणि महाराजांना नमस्कार केला.



राजा बलसागर उसळून म्हणाला, " सेनापती, या नजराण्याची मला काडी-इतकी किंमत वाटत नाही. भिंतीशी चौफेर मांडून ठेवलेले हे शंभर नजराणे पाहा. आपल्या लोहमंडळाचे साम्राज्य केवढे पसरले आहे !

आपल्यापाशी पराक्रमी सेना आहे. म्हणूनच आपण सगळे देश आपल्या मुठीत ठेविले आहेत. पण अद्यापि वसुमतीचा नजराणा आलेला नाही. मला रात्रंदिवस चैन पडत नाही. त्या देशाला राजा सुद्धा नाही. "

सेनापती म्हणाला, " म्हणूनच आतापर्यंत आपणाला ती जिंकता आली नाही. तेथे केवळ एकाची सत्ता नाही, जुलूम नाही व असंतोष नाही. लोक कष्टाळू व देशाभिमानी आहेत. साऱ्या जगात असा सुंदर देश नाही. "

" आणि म्हणूनच मला तो देश पाहिजे आहे. " राजा बलसागर खांबावर मूठ आपटून म्हणाला. " राजा नसलेल्या देशाची स्तुती माझ्यासमोर तुम्हांला कशी करवते ? "

सेनापती म्हणाला, " महाराज, मी आपणास कसे समजावून सांगू ? तेथे राजा नाही, पण लोकांचे नि:स्वार्थी नेते आहेत. तेथे भाडोत्री सैन्य नाही, पण तेथील प्रत्येक रहिवासी देशासाठी जिवाची पर्वा न करता लढणारा सैनिक आहे. "

राजा मोठ्याने हसत म्हणाला, " वसुमतीची इतकी तयारी असती तर तिने शेजारचे देश जिंकले असते. आपल्या लोहमंडळावरही तिने स्वारी केली असती. "

सेनापती विनयाने म्हणाला, " महाराज, या गोष्टी अगोदरच झाल्या आहेत. शेजारच्या देशांची मने वसुमतीच्या लोकांनी प्रेमाने जिंकली आहेत. म्हणून कोणीही त्यांना उपद्रव देत नाही. एवढेच नव्हे तर, आपल्या लोहमंडळाची बाजारपेठ वसुमतीच्या लोकांनी आपल्या श्रमाने आणि कौशल्याने केव्हाच हस्तगत केली आहे. "

राजाला सेनापतीचे म्हणणे पटेना. तो अस्वस्थपणे येरझारा घालू लागला व एकदम थबकून म्हणाला, " सेनापती, माझी खात्री होत नाही. चिमुकल्या वसुमतीला आपण दोन दिवसांत चिरडून टाकू. चला, आपण वेष पालटून वसुमतीत जाऊ आणि तेथील लोकांचे सामर्थ्य पडताळून पाहू."

राजाने श्रीमंत व्यापाऱ्याचा वेष घेतला आणि सेनापती त्याचा नोकर झाला.

राजा आणि सेनापती वसुमतीच्या सीमेवर पोहोचले. राजा म्हणाला, " किती बेफिकीर लोक ! सीमेचे रक्षण करायला येथे एकही सैनिक नाही ! "

सेनापती म्हणाला, " या लोकांना शत्रूचे भय वाटत नाही. हे लोक किती निर्धास्त आहेत, हे आपणच पाहा. तो पाहा गाई चारणारा मुलगा. त्याचीच आपण परीक्षा पाहा. "

राजा म्हणाला, " ठीक आहे. शितावरून भाताची परीक्षा होईल."

राजाने गुराख्याला खूण केली. गाई बाजूला नीट वळवून तो मुलगा राजाजवळ आला. त्याने आपला पावा काखेत धरून हसतमुखाने नमस्कार केला. तो म्हणाला, " पाहुणे कोणत्या गावचे ? आपण दमलेले दिसता ! चालायची सवय दिसत नाही."

राजा त्याच्याकडे नजर रोखून म्हणाला, " काय रे पोरा, तुझे नाव काय ? कुणाच्या चाकरीला असतोस ? काय मिळते तुला ? "

मुलाने उत्तर दिले, " माझे नाव हलधर; मी या गावच्या गाई चारतो. गावचे काम म्हणजे माझेच काम. त्यासाठी पैसा कसला घ्यावयाचा ! "

कमरेचा कसा सोडून मोहरा हलधरापुढे ओतीत राजा म्हणाला, " अगदीच गरीब आहेस तू. या मोहरा घे आणि चैन कर; की येतोस आमच्या देशात ? "

हलधर म्हणाला, " मला काय करावयाच्या आहेत तुमच्या मोहरा ? मला येथे पाहिजे ते मिळते. मी कशाला येऊ तुमच्या देशात ? "

सेनापती म्हणाला, " अरे, आमच्याबरोबर येशील तर तुझी आणखी चैन होईल. नवे नवे सुंदर कपडे, दागदागिने तुला मिळतील. खाण्यापिण्याची चंगळ होईल."

हलधर खो खो हसू लागला. तो म्हणाला, " तुम्ही मला जास्ती चांगले काय देणार ? माझा हा अंगरखा पाहा. हा मी स्वतः विणला आहे. किती स्वच्छ आणि उबदार आहे हा ! तुमच्या पोषाखापेक्षा आणि दागदागिन्यांपेक्षा माझा पोषाख आणि माझे दागिने सुंदर आहेत. तुमच्यासारखे कपडे व दागिने आम्ही बैलांना घालतो. माझ्या घरी येऊन पाहा वाटेल तर."

हलधराचे हे उत्तर ऐकून बलसागर रागावला व म्हणाला, " गुडघ्याएवढा पोर ! आणि आम्हांलाच अक्कल शिकवितो आहे ! आम्ही सांगतो ते मुकाट्याने ऐक."

हलधराने चमकून इकडे तिकडे पाहिले. तो म्हणाला, " अहो, असे विनाकारण का रागावता ? थांबा, मी तुम्हांला माझा पावा वाजवून दाखवितो. तो ऐकून तुमचा राग जाईल. "



हलधराने आपल्या पाव्यावर एक गोड गीत वाजविले. तसले गाणे राजाने कधी ऐकले नव्हते.

राजा म्हणाला, " मुला, तू मोठा चुणचुणीत दिसतोस. तू आमच्या लोहमंडळात चल. मी तेथील राजा आहे. मी तुला सेनापती करीन. " हलधर हसून म्हणाला, " सेनापती कशाला ? लोकांना जिंकून गुलाम करायला ? "

आपले काहीच चालत नाही, हे पाहून राजा रागाने म्हणाला, " सेनापती, या पोराची चुरूचुरू बोलणारी जीभ छाटून टाका. "

हलधर म्हणाला, " महाराज, तुम्ही अन्याय करीत आहात. पण आमच्या पुढे असा अन्याय खपणार नाही. मी उगीच नाही पावा वाजविला. जरा सभोवती नजर टाकून पाहा. " राजाने आणि सेनापतीने सभोवती पाहिले. कुरणाभोवतालच्या झाडीतून भाल्यांची टोके वर दिसत होती.

हलधराने पुन्हा पाव्यातून बोल काढले. क्षणार्धात राजा आणि सेनापती यांच्या भोवती शंभर दीडशे स्त्रीपुरुष सैनिक भाले, तलवारी घेऊन सज्ज उभे राहिले.

हलधरने पुढे होऊन एका वृद्धाला वंदन करून म्हटले, " नायक, हे आपले मोठे पाहुणे लोहमंडळाचे राजे आले आहेत. ते मला लोहमंडळाचा सेनापती करतो, म्हणतात. मी ' नाही ' म्हटले तर माझी जीभ छाटायला निघाले. "

वृद्ध पुढे होऊन म्हणाला, "राजा, तू प्रत्यक्ष पाहातोच आहेस. आम्ही वसुमतीचे लोक कसे आहोत हे तुला समजले ना? तू आमच्या वाटेला जाऊ नकोस. एकाच्या हाकेसरशी सारी वसुमती धावून येईल. आमच्यापैकी प्रत्येक जण राजा आहे आणि सेनापती आहे. पण आम्हांला आमच्या सामर्थ्याची घमेंड नाही. आम्ही अन्याय करणार नाही; पण कोणाचा अन्याय सहनही करणार नाही. आम्ही सर्वांशी प्रेमाने वागतो. आम्ही सर्वांना बंधू समजतो. तुम्ही आम्हीही भाऊ भाऊ म्हणून सलोख्याने नांदू या. त्यात दोघांचेही हित आहे."

वृद्धाने हात पसरले आणि त्यांना अलिंगन दिले. राजाच्या मुखातून शब्द बाहेर पडले, "वसुमती अजिंक्य आहे!" सर्वांच्या कंठातून गर्जना उमटली, "वसुमती अजिंक्य आहे! अजिंक्य वसुमतीचा जयजयकार!"

राजा बलसागर शरमिंदा होऊन आपल्या राज्यात परत गेला. जमविलेले सगळे नजराणे त्याने जिंकलेल्या राजांकडे परत पाठविले आणि जाहीर केले, 'आजपासून साम्राज्य नाही, मांडलीक नाही. सगळे देश वसुमतीसारखे, स्वतंत्र आहेत."

द्वारपाल—देवडीवाला, पहारेकरी. मांडलीक—खंडणी देणारा राजा. नजराणा—भेटीची वस्तू. उपद्रव—त्रास. शरमिंदा—खजील. कसा—पैसे ठेवण्याची लांबट पिशवी.

## अभ्यास

१. 'वसुमती' राज्यातले लोक एकमेकांशी कसे वागत? कशावरून?

२. वसुमतीबद्दल सेनापतीने राजाला काय सांगितले? राजाला काय वाटत होते?

३. राजाने कोणाला वळविण्याचा प्रयत्न केला? कोणत्या उपायांनी? त्याला यश आले का? का?

४. राजावर कोणते संकट आले? ते संकट कोणी टाळले? कोणत्या प्रकारे?

५. 'वसुमती' देश अजिंक्य का राहिला?

६. हस्तगत करणे, शरमिंदा होणे, पडताळून पाहणे, चंगळ होणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

---

# ३०. बाल निर्झरास

[ तुम्ही कधी कोठे एकटे जायला निघालात की, आई तुम्हांला धीर देते, उत्साह देते. त्याप्रमाणे हा बाल झरा प्रवासाला निघाल्यावर कवी त्याला धीर देत आहे. ]



जा हासत खेळत बाल निर्झरा, आनंदाने गात.
खडकाळीतुन जन्माला
तव ओघ असे हा आला,
या कडेकपारी, धावत जाता, देतिल तुजला हात. १

ही गर्द तरूंची छाया
करिते बघ तुजवर माया;
ही हिरवळ घेई झेलुनि तुजला सोसुनिया आघात. २

हे गोटे वाटेमधले
किति सौंगडि अडवुनि दमले,
परि सुरेल गाती खळखळुनी तुज देती आता साथ. ३

तुज अचपळ ऐसा बघुनी
पुष्पेही लतिकांवरुनी,
तुजसवे तरंगी नाचायाला हासुनिया येतात. ४

मोहून तुझ्या द्रुतगतिने
गंधाने, सौंदर्याने;
हा खेळाडू ये खेळायाला तव सांगाती वात. ५

पिकवून नवनवी राने
फुलवून नव्या बहराने
तू तरुण सदाचा असाच राहसि, पोषुनि भू दिनरात. ६

— गिरीश

आघात—मार. सुरेल—गोड सुरात. साथ—सोबत. अचपळ—अतिशय चपळ. द्रुतगती—जलद वेग. भू—पृथ्वी, जमीन. लतिका—वेल. सांगाती—बरोबर. वात—वारा.

## अभ्यास

१. बालनिर्झरास कवी काय सांगतो ? निर्झराला कोण कोण मदत करणार आहेत ? कोणती ? निर्झराबरोबर खेळायला कोण कोण येणार आहेत ? कोणकोणते खेळ खेळणार आहेत ? निर्झराचा कोणता गुण कवीने वर्णन केला आहे ?

२. झऱ्याचे वर्णन करणारे शब्द निवडून काढा. पुढील ओळींचा अर्थ सांगाः—
या कडेकपारी, धावत जाता, देतिल तुजला हात.
परि सुरेल गाती खळखळुनी तुज देती आता साथ.

# ३१. नेताजी सुभाष



"सुभाष, तू मला छळण्याकरिताच का जन्माला आला आहेस?" परत आलेल्या सुभाषला पाहून आई म्हणाली.

सुभाषशिवाय सारे घर सुने सुने वाटत होते. घरच्या मंडळींना अन्नपाणी गोड लागत नव्हते. वाट पाहून पाहून सुभाषबद्दल ते निराश झाले होते. इतक्यात अचानकपणे सुभाषबाबू घरी आले आणि सर्वांना आनंद झाला.

सुभाषने आपल्या आईच्या पायांवर डोके ठेवले आणि तिच्या चरणांची धूळ मस्तकी लावली. दोघांच्याही डोळ्यांतून सारखे प्रेमाचे अश्रू वाहात होते.

सुभाषबाबू कोठे गेले होते व का गेले होते?

१९१३ साली सुभाषबाबू कलकत्ता विद्यापीठाची प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले.

ते परीक्षेत दुसरे आले. नंतर ते कॉलेजात गेले. कॉलेजमध्ये दुसऱ्या वर्षात शिकत असताना एके दिवशी ते हिमालयात निघून गेले. त्यांना साधू व्हावयाचे होते. हिमालयाच्या पहाडांत, दऱ्याखोऱ्यांत वेड्यासारखे ते देवाचा शोध करीत निर्भयपणे भटकले. नंतर ते काशी-वृन्दावनाला गेले. देवळा-देवळांतून हिंडले. त्यांना अनेक साधू, बैरागी भेटले; पण दुर्दैवाने त्यांना भेटलेले सारे ढोंगी व व्यसनाधीन होते. निराश झालेले सुभाष घरी परत आले.

सुभाषबाबू पुन्हा कॉलेजात जाऊ लागले. ते विद्यार्थ्यांत अत्यंत प्रिय होते. विद्यार्थ्यांचे पुढारीपण त्यामुळेच त्यांच्याकडे आले.

१९१९ साली ते बी. ए. ची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. त्या वेळी हिंदुस्थानात स्वातंत्र्याची चळवळ सुरू झालेली होतीच. आपला मुलगा आता चळवळीत पडेल असे वडिलांना वाटले. सुभाषला चांगली मोठी सरकारी नोकरी मिळावी अशी त्यांची इच्छा होती. त्यासाठी विलायतेला जाऊन परीक्षा द्यावी लागे. त्या परीक्षेसाठी सुभाषला त्यांनी इंग्लंडला पाठविण्याचे ठरविले. सुभाषबाबूंना ती परीक्षा देऊन सरकारी नोकर व्हावयाचे नव्हते. त्यांना देशाची सेवा करावयाची होती. पण त्यांनी वडिलांची आज्ञा मान्य केली.

१९२० साली ते परीक्षेत चांगल्या तऱ्हेने यशस्वी झाले. त्यांना मोठी सरकारी नोकरी मिळाली. सुभाषबाबूंनी आपल्या मित्राला लिहिले, "मी परीक्षा उत्तीर्ण झालो ही दुर्दैवाची गोष्ट आहे." त्या वेळी सरकारी नोकर म्हणजे सरकारचे बंदे गुलाम. त्यांना स्वतःच्या देशबांधवांवर जुलमही करावा लागे. हे सुभाषना कसे मानवणार? इंग्लंडात असतानाच एके दिवशी त्यांनी आपल्या जागेचा राजीनामा दिला.

विलायतेहून सुभाषबाबू परतले व मुंबईच्या बंदरावर उतरले. मुंबईस महात्मा गांधी होते. त्यांना ते भेटले. नंतर ते कलकत्त्यास गेले. तेथे बंगाली पुढारी देशबंधू दास यांची त्यांनी भेट घेतली व त्यांच्याबरोबर ते देशसेवा करू लागले. महात्मा गांधींनी त्याच वर्षी असहकारितेची चळवळ सुरू केली होती. तीत सुभाषबाबू सामील झाले. तेव्हापासून तो अखेरपर्यंत त्यांनी देशाची सेवा मोठ्या धडाडीने केली.

सुभाषबाबू हे उत्तम वक्ते व लेखक होते. लागोपाठ दोन वेळा सुभाषबाबूंना राष्ट्रसभेचे अध्यक्ष होण्याचा बहुमान मिळाला. त्यांनी परदेशांत अनेक वेळा प्रवास केला. या प्रवासाचा त्यांना पुढे फार उपयोग झाला.

दुसरे महायुद्ध १९३९ साली सुरू झाले. सुभाषबाबू सरकारला विरोध करतील, काही चळवळ करतील म्हणून सरकारने त्यांच्यावर सक्त नजर ठेवली. तरीही १५ जानेवारी १९४१ रोजी सुभाषबाबू एकाएकी अदृश्य झाले. ते गुप्तपणे व मोठ्या शिताफीने भारताच्या बाहेर पडले. त्याकरिता त्यांनी आपला वेष बदलला. दाढी वाढवून पठाणी पोषाख केला आणि 'गियासुद्दीन' या नावाने प्रवास केला. अनेक देशांतून प्रवास करीत करीत ते जर्मनीत गेले. तेथे 'आझाद हिंद' सेनेची स्थापना केली. तेथून ते सिंगापूरला गेले. सिंगापूरच्या 'आझाद हिंद' सेनेचे ते सरसेनापती झाले.

आझाद हिंद सेनेस संदेश देताना ते म्हणाले, "आपल्याला आपली भारतभूमी स्वतंत्र करावयाची आहे. दिल्लीचा रस्ता हा स्वातंत्र्याचा रस्ता आहे."

"चलो दिल्ली" ही घोषणा करीत सैनिक कूच करीत निघाले. १९४४ मध्ये हे सैन्य भारताच्या पूर्वसीमेवर आले. तेथे त्यांनी मायभूमीला वंदन केले व आपले तिरंगी निशाण फडकविले.

पुढे पावसाळा सुरू झाल्यामुळे ही स्वातंत्र्ययुद्धाची मोहीम थांबवावी लागली.

सन १९४५ मध्ये सुभाषबाबू विमानाने जपानला चालले असता त्यांच्या विमानाचा पंखा तुटला. नेताजींना अपघात झाला. त्यांना इस्पितळात पोहोचविण्यात आले व २८ ऑगस्ट १९४५ रोजी त्यांचा दुःखद अंत झाला.

सुभाषबाबूंचा त्याग, त्यांचे धाडस, त्यांचा पराक्रम फार मोठा होता. अशा पुरुषांच्या सेवेनेच आपला देश स्वतंत्र झाला आहे.

अचानक—एकदम. उत्तीर्ण होणे—पास होणे. व्यसनाधीन होणे—व्यसनाच्या ताब्यात जाणे. सक्त—कडक. अदृश्य होणे—गुप्त होणे.

### अभ्यास

१. सुभाषबाबू विद्यार्थी असताना त्यांच्या आयुष्यात कोणते महत्त्वाचे प्रसंग आले? त्या प्रसंगी त्यांनी काय काय केले?
२. सुभाषबाबूंना सरकारी नोकरी का आवडली नाही?
३. सुभाषबाबू १९४१ मध्ये अदृश्य का झाले? त्यानंतर त्यांनी कोणते मोठे काम केले?
४. त्यांना नेताजी का म्हणतात?
५. सुभाषचंद्रांच्या अंगी कोणकोणते गुण होते?
६. आपल्या स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करणाऱ्या मोठमोठ्या पाच व्यक्तींची नावे लिहा. गुरुजींकडून त्यांची माहिती मिळवा.

---



RITA VAID

# ३२. भूतदया

श्याम रोज रात्री आपल्या मित्रांना एक गोष्ट सांगत असे. श्यामने गोष्टीस सुरुवात केली—

एके दिवशी लहानपणी आम्ही अंगणात खेळत होतो. तुळशीचे अंगण भले मोठे लांबरुंद होते. तुळशीच्या अंगणात एक उंचच उंच बेहेड्याचे झाड होते. एकाएकी टपकन आवाज झाला. मी व माझा धाकटा भाऊ कसला आवाज झाला ते पाहू लागलो. काही तरी पडले होते खास. आम्ही सर्वत्र शोधू लागलो. शोधता शोधता झाडावरून पडलेले एक पाखराचे लहानसे पिलू आढळले. त्याची छाती धडधडत होती. फारच उंचावरून ते पडले होते. त्याची फारच दुर्दशा झाली होती. लोळागोळा झाला होता. अजून त्याला नीट पंख फुटले नव्हते डोळे सुद्धा ते नीट उघडीत नव्हते. लोहाराचा भाता जसा चालत असतो, त्याप्रमाणे त्याचे सारे अंग एकसारखे हालत होते, खालीवर होत होते. त्याला जरा हात लावताच ते आपली सगळी मान पुढे करी व ची ची असे केविलवाणे ओरडे. त्या पिलाला मी घरात उचलून घेऊन न्यावयाचे ठरविले. त्याला एका फडक्यात घेऊन आम्ही घरात गेलो. मी व माझा लहान भाऊ असे दोघे होतो. कापूस घालून त्यावर त्या पिलास ठेविले. आम्हीही लहान होतो. आम्ही तरी काय करणार ? बाळबुद्धीला जे जे सुचेल ते ते करू लागलो. त्या पिलाला दाणापाणी देऊ लागलो. तांदुळाच्या बारीक कण्या आणून त्याच्या चोचीत घालू लागलो. झारीने त्याच्या चोचीत पाण्याचे थेंब घालू लागलो. त्या पिलाला खाता येत होते की नाही, दाणापाणी दिल्यानेच तर ते मरणार नाही ना, याचा आम्ही विचारच केला नाही.

या जगात नुसते प्रेम असूनच भागत नाही. आम्ही त्या पिलावर प्रेम करीत होतो. परंतु आम्हांला ज्ञान नव्हते. त्याच्या चोचीत पीठ, कण्या, नाना पदार्थ भरले व सारखे पाणी ओतले. गरीब बिचारे ! आमच्या अडाणी प्रेमानेच ते बेजार होत होते. त्याने शेवटी मान टाकली. मी त्याला म्हटले, "आम्ही तुला पिंजऱ्यात कोंडून नाही हो ठेवणार. तू बरा हो व आपल्या आईकडे उडून जा. आम्ही दुष्ट नाही बरे. तुझ्या आईसाठी तरी नको रे मरू. ती केविलवाणी ओरडत असेल, घिरट्या घालीत असेल."

आमच्या बोलण्याकडे त्या पिलाचे लक्ष नव्हते. मी आईला म्हटले, " आई, हे पिल्लू बघ कसे करते आहे. अगदी मान वर करीत नाही. त्याला काय खायला देऊ ? "

आई बाहेर आली. तिने पिलाला प्रेमळपणे हातात घेतले व ती म्हणाली, " श्याम, हे जगणार नाही हो. त्याला सुखाने मरू दे. त्याला एकसारखे हात लावू नका. त्याला वेदना होतात. फारच उंचावरून पडले. गरीब बिचारे ! " असे म्हणून आईने ते पिल्लू खाली कापसावर ठेवले व ती घरात कामकाज करावयास निघून गेली. आम्ही त्या पिलाकडे पाहात होतो. शेवटी चोच वासून ते मरून पडले. गेले, त्याचे प्राण गेले ! त्याचे आईबाप, भाऊबंद, कोणी त्याच्याजवळ नव्हते. आम्हांला फार वाईट वाटले. त्याला नीट पुरावयाचे, असे आम्ही ठरविले.

आईला जाऊन विचारले, " आई, या पिलाला आम्ही कोठे पुरू ? चांगलीशी जागा सांग. " आई म्हणाली, " त्या शेवंतीजवळ किंवा त्या मोगऱ्याजवळ पुरा. शेवंतीच्या झाडाला सुंदर फुले येतील. मोगऱ्याची फुले टवटवीत दिसतील. कारण तुम्ही त्या पिलावर प्रेम केले आहे. ते पिल्लू तुम्हांला विसरणार नाही. सुवासिक फुलांच्या रूपाने ते पुन्हा जन्म घेईल व तुम्हांला आनंद देईल."

मी म्हटले, " त्या सोनसाखळीच्या गोष्टीसारखे, होय ना ? सोनसाखळीस तिच्या आईने मारून पुरले, त्यावर डाळिंबाचे झाड लाविले. परंतु सोनसाखळी बापाला भेटायला परत आली. तसेच हे पिल्लू येईल, होय ना ? मग शेवंतीची फुले किती छान दिसतील ? खूप सुवास येईल, नाही का ग आई ! "

आई म्हणाली, " जा लौकर पुरा त्याला. मेलेले फार वेळ ठेवू नये. "

" त्याला गुंडाळावयास आम्हांला चांगलेसे फडके दे ना. " मी म्हटले.

आईची एक जुनी फाटकी जरीची चोळी होती. त्या चोळीचा एक तुकडा आईने फाडून दिला. त्या रेशमी कापडात त्या पिलाला आम्ही घेतले व जेथे फुलझाडे होती तेथे गेलो. शेवंती व मोगरा यांच्यामध्ये त्याच्यासाठी खळगी खणू लागलो. आमच्या डोळ्यांतून पाणी गळत होते. अश्रूंनी जमीन पवित्र होत होती. खळगी खणली. त्या खळगीत फुले घातली. त्या फुलांवर पिलाचा देह वस्त्रात गुंडाळून ठेवला. परंतु त्यावर माती लोटवेना. शेवटी डोळे मिटून माती लोटली. मांजराने खळगी उकरू नये म्हणून वरती सुंदरसा दगड ठेवला व आम्ही घरात गेलो. मी घरात बाजूला बसून रडत होतो.

आई म्हणाली, "अरे रडतोस काय? जा, हातपाय धुऊन ये म्हणजे झाले. वाईट नको वाटून घेऊ. तुम्ही त्याला प्रेम दिलेत, चांगले केलेत. देवही तुमच्यावर प्रेम करील. श्याम, तुम्ही या पाखरावर प्रेम केलेत, तसेच पुढे एकमेकावर करा."

आई हे सांगत असता अगदी गहिवरून आली होती.

भूतदया—प्राण्यावर दया. वेदना—दुःख. बेजार—हैराण.

**अभ्यास**

१. श्यामने कोणाची गोष्ट सांगितली?

२. चिमणीचे पिलू श्यामच्या हाती कसे आले? त्या पिलासाठी मुलांनी काय काय केले? आईने काय काय करायला सांगितले? मुलांनी नंतर काय काय केले?

३. साने गुरुजींची 'सोनसाखळी' व 'मुलांसाठी फुले' ही पुस्तके वाचा. त्यांतील गोष्टी वर्गात सांगा.

४. प्राण्यावर दया दाखवून त्यांना सुखी केल्याची उदाहरणे सांगा.

---

# ३३. संजीवनी

[ ही एक पुराणातील प्रसिद्ध गोष्ट आहे. शुक्राचार्य हे दैत्यांचे गुरु होते. त्यांना संजीवनी विद्या माहीत होती. 'संजीवनी' विद्येमुळे मेलेल्यांना जिवंत करता येत असे. देव व दैत्य यांच्या युद्धात जे दैत्य मरत त्यांना शुक्राचार्य जिवंत करीत. त्यामुळे दैत्यांचा कधीच पराभव करता येईना.

देवांना यामुळे मोठी काळजी वाटू लागली. त्यांनी कचाला शुक्राचार्यांकडे ही विद्या संपादन करण्यासाठी पाठविले. कचाला ही विद्या मिळू नये व देवांचा हेतू सफल होऊ नये म्हणून कचाला दैत्यांनी तीन वेळा ठार केले. पण शुक्राचार्य त्याला संजीवनी विद्येने जिवंत करीत.

शुक्राचार्यांना दारूचे व्यसन मात्र जबर होते. त्यामुळे त्यांची इच्छा नसताही कचाला संजीवनी विद्या कशी द्यावी लागली हे या धड्यात वाचावयास मिळेल. ]

[ शुक्राचार्यांचा आश्रम. युवराज व सेनापती बोलत उभे आहेत. ]

**युवराज** : ( मोठ्याने हसून ) सेनापती, तुमच्या शक्तीने आजवर साधले नाही, ते आज आम्ही युक्तीने साधले की नाही?

**सेनापती** : अजून साधले असे म्हणू नका युवराज. कचाला जिवंत जाळून त्याच्या हाडांची राख आपण दारूत मिसळली खरी; पण—

**युवराज** : पण काय ? एव्हाना ती दारू आचार्यांच्या पोटात गेली सुद्धा असेल.

( पडद्यात—' दानवसम्राट राजाधिराज वृषपर्वा महाराज !' )

**सेनापती** : महाराजही आलेच.

**भालदार-चोपदार** : ( प्रवेशून ) दानवसम्राट राजाधिराज वृषपर्वा महाराज !

[ दरबारी परिवारासह वृषपर्वा येतो. युवराज व सेनापती त्याला अभिवादन करतात. ]

**वृषपर्वा** : ( युवराजास ) आचार्यांनी मद्य घेतले ?

[ इतक्यात शुक्राचार्य येतात. त्यांच्या हातात मद्याचा रिकामा पेला असतो. ]

**शुक्राचार्य** : फारच सुंदर आणि रुचकर !

**युवराज** : गुरुमहाराजांना मद्य आवडलेले पाहून संतोष वाटला.

[ इतक्यात ' बाबा, बाबा ' अशा हाका मारीत देवयानी धावत येते. ]

**देवयानी** : बाबा ! बाबा ! कोणते मद्य घेतलेत ?



**शुक्राचार्य** : युवराजांनी माझ्यासाठी मुद्दाम बनविलेले, फारच मसालेदार !

**देवयानी** : घात झाला ! बाबा, घात झाला ! या चांडाळांनी कचदेवांना जिवंत जाळले आणि त्यांची राख तुम्हांला दारूत पाजली !

**शुक्राचार्य** : ( संतापाने पेला फेकून ) कचाची राख ? युवराज—

**युवराज** : कुभांड ! निव्वळ कुभांड !

**शुक्राचार्य** : माझ्याशी कपट ? बोल, कच कोठे आहे ?

**युवराज** : ( घाबरून ) म....म....मला माहीत नाही.

**शुक्राचार्य** : अधमा, तुझी दुष्कृत्ये माझ्या दिव्य दृष्टीला दिसणार नाहीत असे का तुला वाटते ?

[ शुक्राचार्य ध्यानस्थ बसतात व जराशाने अंगाला झटके देऊ लागतात व समाधीतून उठतात. त्यांची मुद्रा भयंकर रागीट दिसते. ]

**शुक्राचार्य** : ( युवराजास ) चांडाळा, केवढे अघोर कर्म केलेस हे !

**युवराज** : लेकराला क्षमा असावी. केवळ साम्राज्याच्या हितरक्षणासाठीच....

**शुक्राचार्य** : साम्राज्याचे हितरक्षण ? मूर्खा, आपल्या हातांनी दैत्य-साम्राज्याला मूठमाती की रे दिलीस !

**देवयानी** : बाबा, साऱ्या अनर्थाला कारण तुमचेच दारूचे दुष्ट व्यसन !

**शुक्राचार्य** : खरे आहे. दारूमुळेच कचाला माझ्या अंतःकरणात ठाव मिळाला. शत्रू पोटात शिरला. राजा, राजा, दारूच्या व्यसनापायीच माझ्या सामर्थ्याचा आणि तुझ्या साम्राज्याचा समूळ सत्यानाश झाला ! जा, जा. या क्षणी तुझ्या राज्यातून दारूला कायमची हद्दपार कर. दारूमुळे देहाची नासाडी होते, मन मरून जाते, बुद्धी भ्रष्ट होते. दारूमुळे संपत्तीची, लौकिकाची धूळधाण उडते, हे सर्वांना नीट समजावून सांग आणि जो कोणी यापुढे दारू पिईल त्याला कडक शासन कर.

**वृषपर्वा** : जशी आज्ञा. पण एकच विनंती. आतापर्यंत अनेकदा गुरुमाउलीने बृहस्पतीच्या पुत्राला, कचाला जिवंत केले ; पण या खेपेला तरी त्याला जिवंत करू नये.

**शुक्राचार्य** : राजा, कच माझ्या मर्मस्थानी जाऊन बसला आहे रे! तू नको म्हटलेस, मी नाही म्हटले, तरी कच जिवंत होणारच!

**युवराज** : पण संजीवनी मंत्रच आचार्यांनी जपला नाही तर—

**शुक्राचार्य** : मूर्खा, संजीवनी मंत्र मी मुद्दाम जपण्याची जरूरच काय? माझ्या अंतःकरणात तो सहज स्फुरण पावला तरी त्या मंत्राने कच जिवंत होणार आणि त्याला संजीवनी विद्याही मिळणार!

**सेनापती** : मग वैऱ्याला संजीवनी विद्या मिळण्यापेक्षा....

**युवराज** : असेच अखेरपर्यंत दारू पीत राहून गुरुमाउलीने प्राणच सोडले तर....

**देवयानी** : (संतापाने) कृतघ्न राक्षसांनो, हद्द झाली तुमच्या दुष्टपणाची! बाबांच्या तपश्चर्येची राखरांगोळी करून वर आणखी त्यांच्या जिवावर उठता? निर्लज्ज, नादान! जा, चालते व्हा आधी दृष्टीपुढून. (वृषपर्वा, युवराज वगैरे घाबरून निघून जातात.)
बाबा, कचदेव जिवंत होतील ना?

**शुक्राचार्य** : कच जिवंत होणार! आणि मी मात्र मरणार!

**देवयानी** : पण बाबा, कचदेवांना संजीवनी विद्या मिळाल्यावर ते नाही का तुम्हांला जिवंत करणार?

**शुक्राचार्य** : (हताशपणे) कच मला जिवंत करणार! हर हर! संजीवनी मंत्राने साऱ्या जगाला जीवदान देण्याचे ज्याचे सामर्थ्य तो हा तपस्वी शुक्राचार्य वैऱ्याच्या पोराकडून जीवदान मिळविणार!

**देवयानी** : तसे नव्हे बाबा. गुरुदक्षिणा म्हणूनच कचदेव तुम्हांला जिवंत करतील!

**शुक्राचार्य** : पण असली दयेची दक्षिणा घेऊन जिवंत राहण्यापेक्षा दारू पीत पीत मरून जाणेच पत्करीन मी—(जाऊ लागतो.)

**देवयानी** : (अडवून) बाबा, बाबा! माझ्यासाठी तरी ती आग पिऊ नका.

**शुक्राचार्य** : (वैतागाने) मग मी करू तरी काय?

**देवयानी** : सांगितले ना....

**शुक्राचार्य** : ठीक आहे. जशी तुझी इच्छा! जशी पार्वती-परमेश्वराची इच्छा! (ध्यानस्थ बसतात. कच जिवंत होऊन समोर उभा राहतो. तत्काळ शुक्राचार्य मरून पडतात.)

**कच** : मी जिवंत झाल्यामुळे आचार्य मरणार ! मग संजीवनी विद्या मिळाल्याचा उपयोग काय ? ( संजीवनी मंत्र जपतो. शुक्राचार्य जिवंत होतात. कच त्यांच्या पायांवर डोके ठेवतो. )

**शुक्राचार्य** : कचा, अखेर तू मला जीवदान दिलेस !

**कच** : गुरुमाउलीच्या कृपेने मला संजीवनी विद्या मिळाली.

**शुक्राचार्य** : माझ्या कृपेने नव्हे. माझी सेवा हजारो वर्षे केली असतीस तरी माझी संजीवनी विद्या तुला दिली नसती. पण माझ्या दारूच्या व्यसनाने घात केला आणि तुला संजीवनी मिळाली !

**कच** : ( प्रणाम करून ) मला आपला आशीर्वाद असावा !

**शुक्राचार्य** : जा बाळ, तुझा अखंड विजय असो !

दानव—राक्षस. चांडाळ—दुष्ट. अधम—नीच. अघोर—फार दुष्ट. अनर्थ—नाश मर्मस्थान—हृदय. कुभांड—ढोंग. सत्यानाश—समूळ नाश. परिवार—लवाजमा. कृतघ्न—केलेले उपकार न जाणणारा.

## अभ्यास

१. कच कोण होता ? शुक्राचार्यांकडे का आला होता ?

२. शुक्राचार्य कोण होते ? त्यांना कशाचे व्यसन होते ? त्यामुळे त्यांच्यावर कोणते संकट आले ? त्याचा कोणता परिणाम झाला ?

३. संजीवनी विद्येत कोणती शक्ती होती ?

४. मूठमाती देणे, राखरांगोळी करणे, जीवदान देणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

५. हा संवाद करून दाखवा.

---

# ३४. आजीचे घड्याळ

[ निरनिराळ्या वेळी आपण काय करावे हे आजी नेहमी सांगते. तिला या वेळ नेमक्या कशा समजतात, याचे तिच्या नातवाला मोठे आश्चर्य वाटते, तो तिचे घड्याळ शोधून पाहतो. ]



आजीच्या जवळी घड्याळ कसले आहे चमत्कारिक,  
देई ठेवुनि ते कुठे अजुनि हे नाही कुणा ठाउक;  
त्याची टिक् टिक् चालते न कधिही, आहे मुके वाटते;  
किल्ली देइ न त्यास ती कधि, तरी ते सारखे चालते ! १

" अभ्यासास उठीव आज मजला आजी पहाटे तरी—"  
जेव्हा मी तिज सांगुनी निजतसे रात्री बिछान्यावरी.  
साडेपाचहि वाजतात न कुठे तो हाक ये नेमकी,  
" बाळा, झांजर जाहले, अरवला तो कोंबडा, ऊठ की ! " २

ताईची करण्यात म्मत, तसे बाळसवे भांडता,
जाई संपूनिया ाकाळ न मुळी पत्ता कधी लागता !
"आली ओटिवरी उन्हे बघ !" म्हणे आजी, "दहा वाजले."
"जा जा लौकर." कानि तो घणघणा घंटाध्वनी आदळे. ३

खेळाच्या अगदी भरात गढुनी जाता अम्ही अंगणी,
हो केव्हा तिनिसांज ते न समजे, आजी परी आतुनी
बोले, "खेळ पुरे, घरात परता झाली दिवेलागण,
ओळीने बसुनी म्हणा परवचा ओटीवरी येउन !" ४

आजीला बिलगून ऐकत बसू जेव्हा भुतांच्या कथा,
जाई झोप उडून, रात्र किति हो ध्यानी न ये ऐकता,
"अर्धी रात्र कि रे" म्हणे "उलटली, गोष्टी पुरे, जा पडा."
लगे तो धिडधांग पर्वतिवरी वाजावया चौघडा ! ५

सांगे वेळ, तशाच वार तिथिही आजी घड्याळातुनी,
थंडी, पाउस, ऊनही कळतसे सारे तिला त्यातुनी.
ऐसे चित्र घड्याळ ते दडवुनी कोठे तिने ठेविले ?
गाठोडे, फडताळ शोधुनि तिचे आलो, तरी ना मिळे ! ६

—केशवकुमार

झांजर—पहाट. चित्र – चमत्कारिक, विचित्र.

## अभ्यास

१. आजीचे घड्याळ कोठे कोठे शोधले ? ते का सापडले नाही ?
२. आजी कोणकोणत्या वेळा नक्की सांगू शके ? ती कशावरून सांगत असेल ?
३. आजीने मुलांना कोणकोणत्या गोष्टी करण्यास सांगितले ? केव्हा केव्हा ?

---

# ३५. देशाचे संरक्षण

एखाद्या शेतकऱ्याचे लहानसे शेत असले तरी त्याला शेतातील पिकाची जपणूक डोळ्यांत तेल घालून करावी लागते. रात्री बेरात्री हातात लाठी घेऊन शेताभोवती पहारा करावा लागतो. शेतात माळा करून त्यावरून गोफण चालवावी लागते. एका लहानशा शेतासाठी केवढी आटापीट करावी लागते, पाहा.

एका लहानशा शेतासाठी एवढी राखण करावी लागते, तर मग आपल्या या विस्तृत भारत देशासाठी किती काळजी घ्यावयास पाहिजे बरे! आपला हा देश हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पसरला आहे. त्यात सात लक्ष खेडी आहेत. या खेड्यांची पुन्हा शिवारे, कुरणे व जंगले! याशिवाय मुंबई, कलकत्त्यासारखी शहरे व तेथील शेकडो कारखाने आहेतच. एवढ्या मोठ्या विस्तृत भूमीचे संरक्षण शत्रूपासून अहोरात्र करावयाचे म्हणजे केवढे प्रचंड काम आहे, याची कल्पना करा.

आता खेड्यातील शेताचीच गोष्ट घ्या. प्रत्येक शेतकरी तर त्याची राखण करतोच; परंतु तो एकटा किती व कोठे राखण करणार! यासाठी खेड्यातील शेतकरी एकत्र मिळून एक मंडळ काढतात. ग्रामपंचायती जागले नेमून राखणीचे काम पाहतात. देशात शांतता राखण्यासाठी एक स्वतंत्र पोलीस खाते आहे. खेड्यात शहरात व इतर सर्व ठिकाणी लोकांचे संरक्षण करण्याचे काम हे खाते करते. अलीकडे नगरसंरक्षक दलाची पथके तयार झाली आहेत.

परंतु ही सर्व आतील व्यवस्था झाली. देशाचे नुसते आतील संरक्षण करून भागणार नाही. बाहेरच्या शत्रूपासूनही देशाचे संरक्षण झाले पाहिजे; आणि हे काम तर कठीण आहे. पूर्वी शत्रूला या देशावर चालून येणे फार कठीण काम असे. हिमालय पर्वताची अती उंच भिंत उत्तरेला, अवाढव्य समुद्राचे खंदक इतर तीन दिशांना. शिवाय सरहद्दीवरची घनदाट जंगले पूर्वी असतच. या सर्वांतून मार्ग काढणे पूर्वी जड जात असे. परंतु आता पूर्वीचा काळ राहिला नाही.

आता तर शत्रूचे सैन्य कोठून येईल याचा नेम राहिला नाही. विमानात बसून टोळधाडीसारखे ते अस्मानातून येईल, पाणबुडीत बसून मगरी-सुसरीप्रमाणे ते पाण्यातून येईल किंवा रणगाड्यात बसून ते अस्वलासारखे डोंगरकपारी चढून जंगले तुडवीत येईल. त्यामुळे देशाच्या रखवालीचे काम अधिकच बिकट होऊन बसले आहे.

तेव्हा देशाचे संरक्षण या तिन्ही प्रकारच्या संकटांपासून व्हावे, यासाठी आपल्या

देशामध्ये सैन्य नेहमी सज्ज ठेवलेले असते. शत्रू जमिनीवरून आला तर त्याच्याशी चार हात करायला पायदळ तयार आहे. समुद्रातून आला तर नौकादल त्याला तोंड देईल आणि अस्मानातून आला तर विमानदल त्याच्यावर झेप घेईल.



सगळ्यांचे निरनिराळे गणवेष असतात. नौकादलाचा पांढरा शुभ्र, विमानदलाचा निळसर तर पायदळाचा काळसर हिरवा. कोणाच्या डोक्यावर तुरेदार पटके, कोणाच्या डोक्यावर नोकदार टोप्या तर कोणाच्या टोपीवर लाल पिसांचे तुरे. चकचकीत बूट व लखलखीत बटणे. सैन्यातल्या बँडच्या पथकाचा दिमाख तर विचारूच नका. परेडच्या वेळी बँडच्या तालावर अधिकारी व सैनिक कूच करू लागले की, आपलीही पावले त्या तालावर पडू लागतात.

आपले सैनिक किती धाडशी आणि बेडर असतात याची काही कल्पना आहे का तुम्हांला? हुकूम होताच रानावनात, भर समुद्रात, आकाशात, जगाच्या पाठीवर कोठेही जाण्याची त्यांची तयारी असते. देशासाठी एवढे धाडस करण्यास जे सिद्ध असतात त्यांची धन्य नाही का?

ही झाली खड्या फौजेची कथा. या खड्या सैन्याला आणीबाणीच्या वेळी सहाय्य करता यावे म्हणून आपल्या देशात उपसेना उभारण्यात आली आहे. या सेनेत कोणत्याही नागरिकाला प्रवेश मिळतो. स्त्रियांनाही लष्करी शिक्षण

देण्याची सोय झाली आहे. शाळांत आणि महाविद्यालयांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांनाही लष्करी शिक्षण घेता येते.

सैन्यातील अधिकारी तयार करण्याकरिता आपल्या देशाचे पंतप्रधान नेहरू यांच्या हस्ते सैनिक-महाविद्यालयाचा पाया घालण्यात आला. सिंहगडाच्या पायथ्याशी खडकवासला धरणाजवळ राष्ट्रीय संरक्षण महाविद्यालय ( नॅशनल डिफेन्स अॅकडमी ) सुरू केलेले आहे. तुम्ही कोण होणार? सैनिक, खलाशी का वैमानिक?

ज्याच्या शरीरात सामर्थ्य आहे, त्याला रणमैदान खुले आहे. ज्याची छाती निधडी आहे, त्याला समुद्र उघडा आहे; आणि ज्याची नजर बेडर आहे, त्याला आकाश मोकळे आहे. मग कोठे जाता, बोला. आपला देश स्वतंत्र आहे. मग त्याच्या रक्षणासाठी तुम्ही उभे राहणार नाही काय?

मात्र खडकवासल्याचे महाविद्यालय उघडताना पंतप्रधान नेहरू यांनी काढलेले थोर उद्‌गार लक्षात ठेवा. ते म्हणाले होते, "आमचे सैन्य इतर देशांना गुलाम बनविण्यासाठी नाही. आमच्या स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी ते आहे!"

आटापीट--दगदग, शीण. विस्तृत--अफाट. नगरसंरक्षकदल--गावचे संरक्षण करणारे मंडळ. अवाढव्य--फार मोठे, विशाल. नौकादल--आरमार. परेड--लष्करी कवाईत. बेडर--न घाबरणारा. नोकदार--ऐटदार. चार हात करणे--सामना देणे. रखवाली--पहारा. जागल्या--पहारेकरी.

## अभ्यास

१. देशाचे संरक्षण कोण कोण करतात? कोणापासून? कोणत्या प्रकारे?
२. शेताचे संरक्षण कोणत्या प्रकारे केले जाते? कोणापासून?
३. हल्ली देशाचे संरक्षण करणे पूर्वीपेक्षा कठीण का?
४. देशाचे संरक्षण करण्यासाठी तुम्हांस कोण व्हावेसे वाटते? का?
५. खडकवासल्यास जे महाविद्यालय निघाले आहे ते कशासाठी? ते उघडताना नेहरूंनी कोणते उद्‌गार काढले आहेत?
६. तुम्ही आपल्या घराचे संरक्षण कसे कराल?

---

# ३६. शेजारधर्म

"आई, खायला—" अशी भुणभुण लावीत बाळू यशोदाबाईंच्या भोवती घुटमळत होता आणि आईला बरे वाटावे म्हणून तिच्या कामात एवढे तेवढे साह्य करण्यास झटत होता.

सकाळची वेळ होती. सुटीचा दिवस होता. बाळूच्या मागे आज शाळेला जाण्याची भगभग नव्हती. दावे नसलेल्या वासराप्रमाणे तो अगदी मोकळा व मजेत होता.

"आई, खायला—" पुन्हा त्याने तगादा केला. यशोदाबाई आपल्या घरकामात गर्क होत्या. त्या त्याच्याकडे न पाहाता दटावणीच्या स्वरात म्हणाल्या, "माझ्या हाताला उसंत मिळाली म्हणजे मी तुला खायला देणार आहे, बरे का. उगीच गडबड करू नकोस."

त्या दोघा मायलेकरांचे असे बोलणे चालले आहे तोच शेजारच्या राधाबाई तेथे आल्या. यशोदाबाईंनी काम करीत त्यांचे स्वागत केले आणि त्यांना बसण्यास पाटही दिला.

राधाबाई न बसता म्हणाल्या, "मी अगदी उभ्या उभ्या आले आहे आणि माझे काम तुमच्या या बाळूशी आहे." एवढे बोलून त्या बाळूजवळ आल्या आणि गोड स्वरात म्हणाल्या, "बाळू, माझे एक छोटेसे काम करणार का ?"

बाळूने त्यांचे काम समजून घेण्यापूर्वीच हात झाडीत म्हटले, "आपल्याला नाही बोवा वेळ. मला आता अभ्यासाला बसायचे आहे."

यशोदाबाई कामात होत्या, तरी त्यांचे लक्ष बाळूच्या वरील तुसड्या उत्तराकडे गेले. त्या पुढे आल्या व नवल दाखवीत म्हणाल्या, "बाळू, सुट्टीच्या दिवशीही वेळ न दवडता अभ्यास करण्याइतका शहाणा विद्यार्थी तू केव्हापासून झालास ?"

या टोमण्याला राधाबाई हसल्या व बाळू चांगलाच वरमला. त्याला एकदम काही बोलता येईना. तेव्हा राधाबाई त्याची कड घेऊन म्हणाल्या, "यशोदाबाई, बाळू तसा तुमचा शहाणा आहे हो. तो माझे काम ऐकेलच." नंतर त्या बाळूला म्हणाल्या, "माझे काम अगदी सोपे आहे बाळू. ते करायला फार वेळही लागायचा नाही. आमच्या मिनीच्या सोबत म्हणून डॉक्टर जोशांच्या दवाखान्यापर्यंत जायचे आणि औषध घेऊन परत यायचे."

असे बोलत त्यांनी त्याचे डोके कुरवाळले. नंतर आर्जवाने म्हटले, " जा माझ्या राजा, नाही म्हणू नकोस. शेजारधर्म म्हणून माझे एवढे काम तुला केलेच पाहिजे, बरे का. मग मी तुला एक जम्मत देईन."

" बाळू ऐकेल माझे." राधाबाईंनी बाळूला शाबासकी देत म्हटले व त्या कुंकू लावून परत गेल्या.

बाळूने मध्येच ऐटीत म्हटले, " आम्ही सारखी लोकांची कामे करावी वाटते ? मग आम्ही अभ्यास केव्हा करावा ? आणि खेळावे तरी केव्हा ?"

बाळूला सरळ व योग्य उत्तर देणे शक्यच नव्हते. मात्र त्याचे त्यालाच हसू आले. तो आईच्या तोंडाकडे नुसताच पाहात राहिला. तेव्हा यशोदाबाई म्हणाल्या, " बाळू, तुझ्या हिताची गोष्ट सांगते. तुला शेजारधर्माच्या काही गोष्टी आता कळल्या पाहिजेत. आपल्या शक्तीबुद्धीप्रमाणे तो धर्म तू पाळला पाहिजेस."

" आपल्या आजूबाजूला जी माणसे आहेत, त्यांच्या उपयोगी पडणे आणि आपला त्रास त्यांना न होईल याला जपणे हे आपले कामच आहे. यालाच शेजारधर्म म्हणतात."

" लोकांकडून आपल्याला त्रास झाला तरी ?" बाळूने विचारले.

यशोदाबाई म्हणाल्या, " हो हो, आपणांस लोकांनी त्रास दिला तरी त्यांच्या उपयोगी पडले पाहिजे." त्या पुढे म्हणाल्या, " बाळू, या शेजारधर्माचा आणखी फार उपयोग होतो. एका आळीतील कुटुंबे एकमेकांना साह्य करीत गुण्यागोविंदाने नांदू लागली की, ते लोण सबंध गावात पसरते. गावे एकोप्याने वागू लागली की, हळूहळू प्रांत आणि सबंध देश यांच्यामध्येही तीच गोष्ट दिसू लागते. यामुळे सबंध देशाचे कल्याण होते. जा बाळू, राधाकाकूंचे काम आनंदाने करून ये आणि आजपासून लोकांच्या उपयोगी पडण्याचा निश्चय कर."

बाळूने आईचे म्हणणे तत्काळ मान्य केले. कोट टोपी चढवून तो निघाला. तो जात असता यशोदाबाई म्हणाल्या, " मात्र त्यांचे काम उरकताच चटकन तेथून निघून ये. त्या जम्मत काय देतात याची वाट पाहू नकोस व ती घेऊही नकोस."

उसंत—फुरसत. तुसडा—तिरसट. वरमणे—ओशाळणे. कड घेणे—बाजू घेणे.

## अभ्यास

१. शेजारधर्म पाळण्यासाठी काय करायला पाहिजे ? तुम्ही कोणती कामे केली आहेत ? शेजारधर्म पाळला की देशाचेही कल्याण होते. कोणत्या प्रकारे ?

२. राधाबाईचे काय काम होते ? ते काम बाळूला सांगितल्यावर बाळूने काय उत्तर दिले ? बाळूचे उत्तर ऐकून यशोदाबाईंना काय वाटले ? यशोदाबाईंनी बाळूला कोणत्या सूचना दिल्या ? का ?

३. वाक्यांत उपयोग करा :—टोमणा मारणे, आर्जव करणे, गुण्यागोविंदाने नांदणे.

---

# ३७. बिजली

शिदूने आपले शेतातले काम संपविले. संध्याकाळी त्याने बैलांना छपरात नीट बांधून चारापाणी केले आणि तो विहिरीच्या बांधावर विसावा घेत बसला.



अमावास्येची रात्र होती. तशातच आभाळात ढग जमू लागले. अवसेचा काळोख जास्तच दाट झाला.

इतक्यात चमकन वीज झळकली आणि विहिरीजवळच्या मोठ्या जुन्या पिंपळावर पडली. कडकड आवाज करीत झाड मोडून पडले. शिदबा घट्ट डोळे मिटून घाबरून जमिनीसरसा निजून राहिला. थोड्या वेळाने भयंकर गडगडाट झाला. शिदबा बेशुद्धच झाला.

शिदबाने एका कुशीवर वळून डोळे किलकिले करून वर पाहिले. तो मनाशीच म्हणाला, "हा काय चमत्कार! मी स्वप्नात तर नाही ना ?" त्याच्या शेजारी एक देवता उभी होती. तिचे सर्व अंग

लखलखत होते. अंगावरील तलम रेशमी साडीची बुट्टी सोन्यासारखी चकाकत होती. तिचे डोळे पाणीदार आणि तेजस्वी होते. आश्चर्याने टकमक पाहात राहिलेल्या शिदबाच्या तोंडून बराच वेळ शब्दच फुटेना. तो चाचरत म्हणाला, "तू आणखी कोण ? देवी की परी ? कोठून आलीस ? काय नाव तुझे ?"

देवी गोड हसली. ती मंजूळ स्वराने म्हणाली, "शिदबा, ऊठ. भिऊ नकोस. मी देवी आहे. माझे नाव विद्युत. पण तू मला आपला बिजलीच म्हण. मी आताच आकाशातून पिंपळावर उतरले. अरे, आता माझे युग जगात सुरू झाले आहे सगळीकडे. तुमची कामे करण्यास मी आता आले आहे. ते नदीवरचे धरण बांधून झाले म्हणजे मी सगळ्या खेड्यांपाड्यांतून फिरणार. उन्हासारखा लख्ख उजेड अशा अवसेला सुद्धा पाडणार. आणि शिदबा, तुमची सगळी कष्टाची कामे हलकी करून तुम्हांला सुखी करणार ! खेड्यात राहूनच शहरातील सगळ्या सोयी मी देणार आहे तुम्हांला."

शिदबाला खरेच वाटेना. तो म्हणाला, "मला स्वप्न तर पडत नाही ना ? असे झाले तर किती मजा होईल ! पण तू एकटी ही सगळी कामे करणार ? माझा नाही विश्वास बसत यावर !"

बिजली खुदकन हसली. ती म्हणाली, "वेडा रे वेडा. अरे, मी मनुष्याच्या किती उपयोगी पडते, ते सांगून विश्वास बसणार नाही. इतक्या त्या गोष्टी अद्भुत आहेत. हातच्या काकणाला आरसा कशाला ? तुला एका क्षणात प्रत्यक्षच दाखवते. ऊठ, घाबरू नकोस. माझा हात घट्ट पकड. झटका नाही बसायचा. चल माझ्याबरोबर. मात्र जरा जपून हं. बोट सोडू नकोस."

बिजलीचा हात धरून शिदबा आभाळातून तरंगत विजेच्या गतीने फिरत होता. त्याला शहरे, खेडी, शेते, जंगले, नद्या, समुद्र ही लहान लहान दिसत होती. शिदबा कधी उंच उंच जाई; तर कधी कधी घारीप्रमाणे झेप टाकून अगदी घरांच्या छपरांजवळून जाई. हे देखावे पाहून शिदबाचे मन विस्मयाने भरून गेले.

विजेचे अनेक दिवे लकाकत होते. रस्त्यावरच्या दिव्यांच्या रांगा मोत्यांच्या माळे-प्रमाणे शोभत होत्या. समुद्रातील दीपगृहाचा विजेचा दिवा दूरवर उजेडाचा झोत पाडीत होता. त्याच्या प्रकाशामुळे बंदरात आगबोटी सुखरूप येत होत्या. रुळावरून विजेच्या गाड्या धावत होत्या. विजेचे पंखे फिरत होते. कारखान्यांत विजेच्या शक्तीने यंत्रे फिरून भराभर माल निघत होता. पाणी तापत होते. शेगड्या पेटत होत्या.

भट्ट्या रसरसल्या होत्या. तारायंत्राने इकडची बातमी दूरवर एका क्षणात जात होती. कोणी टेलिफोनवर बोलत होते. घरोघरी रेडियोजवळ बसून लांबच्या ठिकाणी



चाललेले गाणे, भाषण लोक ऐकत होते. एके ठिकाणी सभेत जमलेल्या हजारो लोकांना विजेच्या ध्वनिक्षेपक यंत्रामुळे वक्त्याचे भाषण स्पष्ट ऐकू येत होते.

शिदू अगदी भांबावून गेला. तो म्हणाला, " तुझे इतके उपयोग दिसले; आणखीही असतील. पण माझ्या घरी काय आहे ? "

विजली म्हणाली, " हे पाहा तुझे घर आले. डोकावून बघ आत. कसा उजेड पडला आहे ! बघ तुझी आई दळण दळते आहे. जाते विजेने फिरते आहे. बाबा विजेचा माग चालवीत आहेत. आता आपण आलो आपल्या शेतावर. विहिरीतून विजेच्या पंपाने पाणी वर येत आहे. सोड बोट. अरे, असा पुन्हा जमिनीवर काय निजलास ? दमलास प्रवास करून ? थांब. तुझ्या तोंडावर पाण्याचे थेंब उडवते. जागा हो ! "

पावसाची सर अंगावर पडल्यामुळे शुद्धीवर येऊन शिदबाने डोळे उघडले. पाऊस जोराचा पडू लागला होता. जवळच आईबाप उभे होते. बाबा म्हणत होते, " जागा हो शिदबा. दमलास काम करून ? आणि असाच विहिरीच्या बांधावर निजलास ? अरे, तुला काही शुद्ध ? पिंपळ मोडला बघ वीज पडून. बरे झाले

अंगावर नाही पडली !"

आई म्हणाली, "दुष्ट मेली विजली ! संकट टळले. सुखी राहा, बाळा."

शिदवाने उठून अंग झटकले. तो म्हणाला, "स्वप्नच पडले. पण किती सुंदर ! आई, बिजली देवता आहे देवता ! आपण सुखी होणार. विजलीमुळे खेड्यांतही सर्व सुखसोयी होणार आहेत आता !"

चाचरत--अडखळत. विद्युत--वीज. युग--काल. विस्मय--आश्चर्य. ध्वनिक्षेपक--आवाज दूर पसविणारे.

**अभ्यास**

१. शिदवा कोणाबरोबर हिंडून आला ? त्याला का नेले ?
२. शिदवाने काय काय पाहिले ? जे पाहिले ते खरे की खोटे ? का ?
३. बिजली चांगली की वाईट ? शिदवाच्या आईला काय वाटले ? शिदवाला काय वाटले ? का ?
४. तारायंत्र, टेलिफोन व रेडियो यांचा आपणांस काय उपयोग आहे ते सांगा.
५. बिजलीमुळे खेड्यांत कोणकोणत्या सोयी होतील ?

---

## ३८. कृष्णाची वनक्रीडा

[ श्रीकृष्णाच्या लीला सर्वांनाच आवडतात. आपल्या सवंगड्यांबरोबर श्रीकृष्ण रानात जाई, निरनिराळ्या क्रीडा करी. रानात गेल्यावर श्रीकृष्ण गवळ्यांच्या मुलांबरोबर जे खेळ खेळे, तीच त्याची वनक्रीडा. या कवितेत या क्रीडेचे मजेदार वर्णन केले आहे. ]

वनी खेळती बाळ ते बल्लवांचे ।
तुरे खोविती मस्तकी पल्लवांचे ।
फुलांचे गळां घालिती दिव्य हार ।
स्वनाथासवे ते करीती विहार ॥१॥

स्व-कौशल्य ज्या गुंज-माळांत नाना ।
गळां घालिती ते करीती तनाना ।
शिरी बांधिती मोर-पत्रे विचित्रे ।
शरीरावरी रेखिती दिव्यचित्रे ॥२॥

मुखे वासुनी, लोचन-भ्रूतटाते ।
उभारूनिया वाकुल्या मर्कटाते ।
अहो, दाविती शब्द तैसे करीती ।
असे खेळती बाळ निःशंक रीती ॥३॥

वनी देखता मेघनीलास मोर ।
प्रमोदे करी नृत्यलीला समोर ।
तयासारिखे नाचती तोक सारे ।
खुणावूनि अन्योन्य की, तो कसा रे ॥४॥

वदे कृष्ण गोपाळबाळां जनाते ।
'बसूनी करू ये स्थळी भोजनाते ।
वनी वत्स सोडा चरायासि, पाणी ।
तयां पाजुनीया,' म्हणे चक्रपाणि ॥५॥

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना ।
रचुनि बसवि ऐसी भोवती बालसेना ।
हरि-वदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ।
म्हणुनि बहुत पंक्ती मंडलाकार केल्या ॥६॥

असे कर्णिका अंबुजामाजि जेवी ।
मुलांमध्यभागी बसे कृष्ण तेवी ।
मुखी ग्रास सप्रेम घालूनि हाती ।
दही भात दे, सर्व लीला पहाती ॥७॥

—वामनपंडित

बल्लव—गवळी. स्वनाथासवे—आपल्या पुढाऱ्याबरोबर, श्रीकृष्णाबरोबर. तनाना—ताना, गाणे. भ्रूतट—भुवई. मेघनील—मेघासारखा निळा, कृष्ण. तोक—मुलगे. अन्योन्य—एकमेकांस. चक्रपाणी—ज्याच्या हातात चक्र आहे तो, कृष्ण. कर्णिका—कमळाचा मध्यम भाग. अंबुज—कमळ.

### अभ्यास

१. गवळ्यांची मुले कोणाबरोबर खेळत होती ? ती मुले कोणकोणत्या क्रीडा करीत होती?
२. गोपाळांच्या पोशाखाचे थोडक्यात वर्णन करा. त्यांचे बोलणे, नाचणे कोणा-कोणासारखे होते ?
३. गोपाळांच्या मुलांना श्रीकृष्णाने काय करायला सांगितले ? ते जेवायला वर्तुळात का बसले ? कृष्ण कोठे बसला ? कोणासारखा ?

---

## ३९. नरसी महेता

सौराष्ट्रात गिरनार नावाचा एक मोठा पर्वत आहे. त्याच्या पायथ्याशी जुनागढ नावाचे फार प्राचीन काळचे राजधानीचे मोठे शहर आहे. जवळ जवळ पाचशे वर्षांपूर्वी या शहरात नरसी महेता नावाचे एक मोठे भक्त व संत पुरुष होऊन गेले. ते अत्यंत उच्च अशा नागर जातीत जन्मले होते. पण भगवंताचे भजन करण्यात ते असला जातिभेद विसरून गेले होते. जे कोणी ईश्वराचे भजन–भक्ती करीत त्यांच्याच बरोबर ते राहात व फिरत असत. ते स्वतः भजने तयार करीत व गोड गळ्याने एकतारीवर म्हणत. ते प्रभुभक्त कसे बनले यासंबंधी एक आख्यायिका आहे, ती अशी :

एकदा त्यांची भावजय त्यांना खूप टोचून बोलली. ते त्यांना सहन झाले नाही. तेव्हा त्यांनी आपले घर सोडले. दूर समुद्रकिनारी भावनगरजवळ गोपनाथ म्हणून तीर्थक्षेत्र आहे, तेथे जाऊन राहिले. तेथे त्यांनी अन्नपाणी सोडून महादेवाची भक्ती सुरू केली. त्यामुळे महादेव त्यांच्यावर प्रसन्न झाले व काय हवे ते मागण्यास सांगितले. नरसींनी ‘ मला कृष्ण भगवानाचे दर्शन करवा, ’ असे सांगितले. तेव्हापासून कृष्णाचा साक्षात्कार झालेले असे उच्च कोटीचे ते भक्त बनले.

जुनागढहून गिरनारकडे जाण्याच्या रस्त्यावर दामोदर कुंड म्हणून एक तीर्थस्थान आहे. पुष्कळजण या कुंडावर स्नान करण्यास रोज जुनागढहून येत. नरसी महेताही रोज पहाटे येथे स्नान करून जात. एकदा ते स्नान आटोपून घरी जायला निघाले, तो वाटेत धेड लोक भेटले. ते हात जोडून उभे राहिले. भक्त नरसीने विचारले, “ काय काम आहे मित्रांनो ? ”

“ आपल्याला एक विनंती करावयाची आहे. आपण आमच्या महारवाड्यात

एकदा भजन करायला यावे, अशी आमची इच्छा आहे. आपण येऊन कीर्तन केले, तर आपली मोठी कृपा समजू आम्ही. "

भक्त म्हणाले, " हो, मोठ्या आनंदाने येईन. प्रभूचे भजनकीर्तन करायला कोठली हरकत ? अवश्य येईन. "

धेड खूप आनंदित झाले. जवळ उभे असलेले ब्राह्मण व नागर लोक मात्र तोंडात बोट घालून उभे होते.

" काय ? नागर महारवाड्यात जाणार ? या महेत्याला खास वेड लागले. " लोक खूप बडबडू लागले.

नरसी महेतांना तसे काही वाटत नव्हते. उच्च जातीनी नीच जातीतील लोकांना शिवायचे सुद्धा नाही, असला भेद नरसींच्या मनात मुळीच नव्हता. त्यांनी महारवाड्यात जायचे मोठ्या आनंदाने कबूल केले.



इकडे महारवाड्यात आनंदीआनंद झाला. त्यांनी आपला महारवाडा सबंध झाडून साफ केला व फुलांपानांनी सुशोभित केला. कीर्तनाची जागा लिंपून सारवून

छान केली. बाजूला एक तुळशीचे वृंदावन उभे केले. तेथे तुपाचे निरांजन लाविले. नरसी महेतांचे कीर्तन म्हणजे त्यांना जणू मोठा उत्सव वाटला.

महेता रात्री महारवाड्यात आले. त्यांनी हातात चिपळ्या घेऊन पहाटेपर्यंत भजनकीर्तन केले. सगळ्यांनी मोठमोठ्याने टाळ्या वाजवून त्यांच्याबरोबर भजने म्हटली.

दुसऱ्या दिवशी सबंध जुनागढ शहरात ज्याच्या त्याच्या तोंडी ही एकच गोष्ट. महेतांची नागर जात तर फारच कर्मठ होती. त्यांना हा भ्रष्टाकार मुळीच सहन झाला नाही. त्यांनी महेतांना वाळीत टाकल्यासारखे केले. लोक प्रत्येक लहानमोठ्या गोष्टीत त्यांच्या मार्गात अडचणी उत्पन्न करीत. त्यामुळे महेतांना फार त्रास होई. पण प्रत्येक वेळी असे काही तरी होई की, त्यामुळें महेतांचे काम पार पडे व त्यांची फजिती करायला निघालेली मंडळी स्वतःच फजीत होत.

एकदा द्वारकेला तीर्थयात्रेस जायला निघालेला एक संघ जुनागढला आला. द्वारकेला इतक्या दूर पायी जाता जाता वाटेत आपल्या जवळचे पैसे चोरांनी लुटले तर काय करायचे, अशी त्यांना काळजी वाटू लागली. त्यांनी असा विचार केला की, येथेच कोणा सावकाराजवळ पैसे ठेवावे व द्वारकेच्या सावकाराच्या नावाने हुंडी लिहवून घ्यावी. गावात ती मंडळी चौकशी करू लागली की, कोणाजवळ ठेव ठेवावी. गावातील काही गुंड मंडळींना नरसी महेतांची चेष्टा करावीशी वाटली. त्यांनी या मंडळींना सांगितले की, "नरसी महेताजवळ ठेवा पैसे व तो देईल हुंडी लिहून. तोच आहे गावचा मोठा शेठ."

प्रवासी नरसी महेताजवळ आले. नरसी महेतांनी देवाचे नाव घेऊन द्वारकेचा मोठा शेठ शामळशा याच्या नावावर हुंडी लिहून दिली. असे म्हणतात की, कृष्ण-भगवानाने स्वतः द्वारकेच्या शामळशाचे रूप घेऊन त्या हुंडीचे पैसे प्रवाशांना दिले व आपल्या महान भक्ताची पत राखिली.

इतके झाले तरी लोकांच्या मनाला शांती वाटेना. त्यांनी गावच्या राजाला सांगितले की, नरसी महेता ढोंगी आहे व गुन्हेगारही आहे. शेवटी राजाने नरसी महेतांना कैदेत ठेवले. तेथेही त्यांना देवाने मदत केली. राजालाही पुढे कळून आले की, हा भोंदू नसून देवाचा खरा भक्त आहे. तेव्हा त्याला पश्चात्ताप होऊन त्याने नरसी महेतांच्या पायांवर डोके ठेवले व क्षमा मागितली.

नरसी महेतांच्यावर पुढे पुष्कळ आपत्ती कोसळल्या. त्यांची पत्नी व मुले वारली.

पण नरसींच्या मनाची शांती व भक्ती पूर्ववत कायम राहिली. उलट ते म्हणत—

"भलुं थयुं भांगी जंजाळ। सुखे भजीशुं श्री गोपाळ"

याचा अर्थ असा की, 'संसाराचे पाश तुटले हे बरे झाले. आता एकचित्ताने देवाचे भजन तरी करीन.'

याप्रमाणे ईश्वराच्या या परमभक्ताने भगवंताचे नामस्मरण करीत करीत आयुष्य पुरे केले.

आख्यायिका—ऐकीव गोष्ट. साक्षात्कार होणे—प्रत्यक्ष अनुभव येणे. कर्मठ—जुन्या धर्मरूढी कडक रीतीने पाळणारे. भ्रष्टाकार—धर्मशास्त्राच्या विरुद्ध वागणूक. पत—अब्रू. आपत्ती—संकट. उच्च कोटीचे—श्रेष्ठ दर्जाचे.

### अभ्यास

१. नरसींनी घर का सोडले ?
२. नरसींना धेड लोकांनी कोणती विनंती केली ? नरसींनी काय केले ? त्यामुळे कोणकोणते परिणाम झाले ?
३. श्रीकृष्णाने नरसींची अब्रू केव्हा व कशी राखली ?
४. ज्ञानेश्वर व नरसी महेता यांच्यातील सारखे गुण कोणते ?
५. टोचून बोलणे, पत राखणे, फजीत होणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

---

## ४०. संकटकाळची सोय

दौलती सकपाळ हा मोठा कष्टाळू, विचारी, वाकबगार कारागीर होता. त्याचा मुलगा राणू अबोल स्वभावाचा होता. दहा-बारा वर्षांचे त्याचे वय. पण त्याला समज चांगली होती.

राणूची आई गजरा जरा बोलक्या स्वभावाची होती. धाकटी बहीण तानी आपल्या आईसारखीच. गजराला तीन चार महिने बरे नव्हते. पहिल्या पहिल्याने ती कसेबसे स्वयंपाकपाणी करून नवऱ्याला व मुलांना जेवायला घालायची. पण दोन महिन्यांपासून तिने आंथरूण धरले. तेव्हा सकाळची भाजीभाकरी ती राणूकडून सांगून सांगून करून घ्यावयाची. छोटी तानी देखील, 'हे आण,' 'ते उचल' असे करून भावाला मदत करायची. संध्याकाळचा स्वयंपाक दौलती स्वतः करून

सगळ्यांना खाऊ घालायचा. राणू आपले घरकाम उरकून दवाखान्यातून आईला औषध आणून द्यायचा आणि शाळेत जायचा.

निजल्या निजल्या गजरा म्हणायची, " काय भोग आला आहे हा माझा ! सोन्यासारख्या लेकरांना कष्ट पडतात. घरधन्याला सुखाची भाकर खायला मिळत नाही. मी अशी निरुपयोगी पडलेली, आणि वर औषधाचा खर्च ! "

दौलती रोज तीन साडेतीन रुपये मिळवी. त्यात त्याचा संसार ठाकठीक चाले व गजराचे औषधपाणी होई. पण आज त्याचाच उजवा हात जखमी झाला. हातावर पोट भरणारा व चार जणांचा पोशिंदा निकामी झाला !

हा सगळा अवघड प्रसंग जमून आलेला पाहून गजराचा धीर अगदी सुटला. ती धाय मोकलून रडायला लागली. " फुकट माझे जिणे ! " ती म्हणाली, " कष्ट करून घरधन्याला मदत करायलाही माझा उपयोग नाही, उलट मीच दुखणेकरी होऊन घुशीसारखी त्याचे घर खाते आहे. आता त्याचा हात बंद पडला. देवा, आमचे कसे होईल ? माझी पोरे कुणाकडे बघतील ? "

" तू काही भिऊ नकोस कारभारणी. उद्या आपण आपल्या गावी जाऊ बाबांकडे. तू आणि मी बरी होईपर्यंत चांगले महिनाभर राहू तेथे. आपल्या राणूला आता सुटीच आहे महिन्याची. तोच आपल्याला सांभाळून नेईल गावाकडे. "

" अहो, पण पैशाअडक्याचे काय ? " गजराने काळजीच्या आवाजात विचारले. " तुमची तर कमाई बंद झाली. तिकडे गावी त्या बिचाऱ्यांना जेमतेम पोटापुरते आहे. आम्ही आणखी चार माणसांनी जाऊन त्यांना संकट घालायचे ? "

" त्याची तू काही काळजी करू नकोस. पैशाची तरतूद उद्याच होत आहे. "

" ती कोठून ? पैशासाठी सावकाराच्या फासात पडणार की काय माझ्यापायी ? कर्ज काढायची वेळ न येवो आमच्यावर. फेड करता करता जीव झिजायचे. "

" तुला म्हणालो ना चिंता नको म्हणून. सावकाराचे कर्ज नाही मी काढले. "

" मग काय केलेत ? "

" ते सावकाश सांगेन. आपण बरी होऊ. आता काही काळजी करू नकोस कशाची. "

हे बोलणे राणूने ध्यान देऊन ऐकले होते. दुसऱ्या दिवशी ती सगळी माणसे आपल्या खेड्याला राहायला गेली. तेथे दौलने आपल्या म्हाताऱ्या बापाला सगळी हकीकत सांगितली आणि त्यांच्याजवळ पन्नास रुपये देऊन ठेवले. खेडेगावच्या

मोकळ्या हवेत दवापाणी वेळच्या वेळी घेऊन गजरा हळू हळू चांगली बरी झाली. दौलतीचा दुखावलेला हात सुधारला. राणू व धाकटी तानी ही अंग धरून गाजरासारखी रसरशीत झाली. एक महिना अशी आनंदात, सुखासमाधानात खेड्यावर राहून मग मंडळी वडील माणसांचा निरोप घेऊन आपल्या घरी आली. पुन्हा त्यांचे घर सुरळीत सुरू झाले.

पुढे एकदा रात्री जेवताना गजराने दौलूला विचारले, "आता सांगाल का गेल्या महिन्याच्या खर्चाचे पैसे कोठून आणलेत ते ?" राणूलाही ते ऐकायचे होते. बायकोकडे व मुलांकडे पाहात पाहात दौलतीने थोडक्यात सगळा उलगडा केला. तो म्हणाला, "आपले श्रीपती गुरुजी आहेत ना ! त्यांच्या सांगण्यावरून मी सहकारी पतपेढीचा सभासद झालो आहे."

"दहा दहा रुपयांचे पाच भाग घेऊन मी भागीदार झालो. अडचणीच्या वेळी ही पतपेढी कर्ज देते."

"म्हणजे शेवटी कर्जच काढायचे ना ?"

"होय, ते खरे. पण आपणही भागीदारीत आधी थोडा पैसा घातला आहे. म्हणून कमी व्याजाने आपल्याला कर्ज मिळते. ते हप्त्याने फेडता येते. पतपेढीत ही सोय नाही का चांगली ?"

"तेही खरेच. आपल्यावर विश्वास टाकून पैसे देतात हे काय कमी आहे ?" गजरा म्हणाली.

"पतपेढीचे कर्ज बुडवून चालणार नाही. पुन्हा वेळ प्रसंग आला तर तिचाच आधार आहे आपल्याला. आता एका वर्षात आपण कर्ज फेडून टाकू."

"देव पावला बाई," गजरा म्हणाली, "आता काही काळजी राहिली नाही. आपापसातलीच देवाणघेवाण होते आहे ही. सावकाराचे तोंड पाहावे लागले नाही."

राणू मोठा विचारी होता. त्याला ही हकीकत मोठी मजेदार वाटली. त्यालाही वाटले की, काम करून पोट भरणाऱ्या लोकांना अडीअडचणीसाठी एकमेकांच्या मदतीवर चालणाऱ्या सहकारी पतपेढीसारखा दुसरा आधार नाही.

पोशिंदा—पोषण करणारा. अबोल—कमी बोलणारा. भोग येणे—नशिबी येणे. वाकबगार—हुशार, कुशल. हातावर पोट भरणे—रोजच्या मोल-मजुरीवर पोट भरणे. तरतूद—व्यवस्था. जेमतेम—कसेतरी. अंग धरणे—गुटगुटीत होणे. सहकारी—एकमेकांच्या मदतीने चालणारी.

## अभ्यास

१. दौलतीला पैशांची गरज का लागली ? त्याने पैसा कोठून आणला ? त्याला तो कसा मिळू शकला ? पैसा मिळाल्यामुळे त्याची कोणती मोठी सोय झाली ? कोणता फायदा झाला ?
२. सावकारापेक्षा सहकारी पतपेढी का चांगली ? राणूला विशेष आनंद केव्हा झाला ? का ? राणूच्या आईला कसले समाधान वाटले ?
३. वाक्यांत उपयोग कराः—चारांचा पोशिंदा, धाय मोकलणे, सावकाराचे तोंड पाहणे, हातावर पोट भरणे, धीर सुटणे.
४. गावातल्या सहकारी पतपेढीला भेट द्या. तेथील चिटणिसाकडून पेढीची आणखी माहिती मिळवा.

# ४०. कैलास



आम्ही प्रथम औरंगाबादला गेलो. तेथे आमच्या ओळखीचे एक प्राध्यापक होते. त्यांनी अनेक वेळा वेरूळ पाहिले होते. त्यांना बरोबर घेऊन आम्ही वेरूळला गेलो. ते एकेका लेण्याची माहिती आम्हाला देत होते. ती ऐकता ऐकता व डोळ्यांसमोरच्या

लेण्याची भव्यता आणि सौंदर्य पाहता पाहता आमच्या तोंडून " ओहो ! वा वा ! " असे उद्‌गार निघत. तेव्हा ते आम्हांला म्हणत, " पण अजून तुम्ही कैलास लेणे पाहिले नाही. ते पाहाल तेव्हा आश्चर्याने तुम्ही थक्क व्हाल. कैलास म्हणजे जगातले एक आश्चर्य आहे. "

कैलासाच्या महाद्वारापाशी आम्ही येऊन पोहोचलो, तेव्हा पुतळ्यासारखे उभेच राहिलो. त्या लेण्याच्या भव्यतेला आणि सौंदर्याला खरोखर सीमा नाही. इतर लेणी डोंगराच्या आत कोरलेली आहेत; सुटी नाहीत. पण कैलास लेणे तसे कोरलेले नसून चारी बाजूने सुटे आहे. डोंगराचा मधलाच एक भाग कोरून त्यालाच देवळाचे स्वरूप दिले आहे. खडकाची कमीजास्त खपली न उडू देता त्याचे खोदकाम केलेले आहे. त्यात चुन्याचा व सुट्या दगडाचा किंचितही उपयोग केलेला नाही. अशा पद्धतीने ' कैलास मंदिर ' खोदणारे कलावंत धन्य आहेत.



देवळाच्या तळापासून तो शिखरापर्यंत अशी बोटभरही जागा नाही की, जेथे कोरीव काम नाही. वाघांची आणि इतर पशूंची तोंडे अशा झोकाने कोरली आहेत की,

त्या पशूंनी कैलासाला आपल्या पाठीवर तोलून धरले आहे, असा भास व्हावा' महाद्वारापाशी द्वारपाल म्हणून स्त्रियांची चित्रे कोरलेली आहेत. कैलासाचे काम पार्वतीसाठीच केले असल्यामुळे त्या मंदिरावर स्त्री—द्वारपालांची योजना केली असावी.

महाद्वारापर्यंत येताना आम्हांला अनेक दरवाजे लागले होते. कोरीव कामाने भरलेल्या खिडक्या, भले मोठमोठाले नक्षीदार खांब व गुळगुळीत प्रशस्त ओवऱ्या आम्हांला दिसल्या.

महाद्वारातून आम्ही आत गेलो तेव्हा लक्ष्मीची मूर्ती दृष्टीस पडली. मध्यभागी कमळ असून त्यावर लक्ष्मी आसन घालून बसलेली आहे. उजव्या व डाव्या बाजूस दोन हत्ती आहेत. सोंडेत धरलेल्या पात्रांनी ते तिच्यावर अभिषेक करीत आहेत. खालून दुसरे दोन हत्ती पाण्याने भरलेली भांडी वर देत आहेत.

कृष्णराज नावाच्या एका दानशूर राजाने येथील शिवलिंगाची स्थापना केली असे म्हणतात. शिवलिंगाच्या दर्शनासाठी जाताना मोठा सभामंडप ओलांडावा लागतो. तो खूप विस्तीर्ण असून त्याला पाच दरवाजे आहेत. नक्षीदार खांब आणि अगदी गुळगुळीत फरशी यांमुळे हा सभामंडप सुंदर आणि भव्य दिसतो. वरच्या छताच्या मध्यभागी लक्ष्मी-नारायणाची मूर्ती खोदलेली आहे. सभामंडपाच्या कोठ-ल्याही कोपऱ्यातून तिच्याकडे बघितले तरी मूर्तीची नजर आपल्याकडेच आहे असे पाहाणाऱ्याला वाटते. शिवलिंगाला प्रदक्षिणा घालण्यासाठी प्रशस्त वाट आहे.

देवळाभोवती खूप मोठ्या ओवऱ्या आहेत. त्यांत जिकडे तिकडे देवदेवतांची व पुराणांतील प्रसंगांची चित्रे कोरलेली आहेत.

कैलासाचे हे सौंदर्य पाहिले की, अंतःकरण आनंदाने भरून जाते. अशी ही कला आपल्या देशातून नाहीशी व्हावी याबद्दल हळहळ वाटते. त्या काळातल्या कारागिरांच्या कौशल्याची प्रशंसा कोणत्या शब्दांनी करावी ते सुचत नाही.

प्रत्येक भारतीयाने वेरूळची ही लेणी एकदा तरी अवश्य पाहावीत.

## अभ्यास

१. वेरूळची लेणी कोठे आहेत ? वेरूळमधील 'कैलास' म्हणजे कोणता भाग ? महाद्वारावर स्त्री-द्वारपाल का कोरले आहेत ?
२. वेरूळची कोरीव लेणी पाहिल्यावर मनावर कोणता परिणाम झाला, हे सांगणारी वाक्ये शोधा व त्यांचा अर्थ सांगा. 'कैलास' मधील कोणकोणत्या कोरीव कामांची वर्णने या धड्यात दिली आहेत ? कोणती विशेष माहिती दिली आहे ?
३. अर्थ सांगून वाक्यांत उपयोग कराः—प्रशंसा, भव्य, हळहळ.
४. तुम्ही पाहिलेल्या कोणत्याही ठिकाणाचे १५ ओळींत वर्णन लिहा.

## ४२. संतांचा उपदेश

[ संत तुकाराम व समर्थ रामदास हे मोठे साधू पुरुष होते. या कवितांत त्यांनी आपल्याला चांगला उपदेश केला आहे. ]

### १ संत तुकाराम



बोले तैसा चाले । त्याची वंदीन पाउले ॥
अंगे झाडीन अंगण । त्याचे दास्यत्व करीन ॥
त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥
तुका म्हणे देव । त्याचे चरणी माझा भाव ॥ १ ॥
जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधू ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥
मृदू सबाह्य नवनीत । तैसे सज्जनाचे चित्त ॥
ज्यासि आपंगिता नाही । त्यासि धरी जो हृदयी ॥
दया करणे जे पुत्रासी । तोचि दासा आणि दासी ॥
तुका म्हणे, सांगू किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ २ ॥

## २. संत रामदास



पोटी चिंता धरू नये । कष्टे खेद मानू नये ।
समयी धीर सोडू नये । काही केल्या ॥
नीच कृत्यी लाजू नये । वैभव होता माजू नये ।
क्रोधे भरी भरो नये । जाणपणे ॥
परोपकार सांडू नये । परपीडा करू नये ।
विकल्प पडो देऊ नये। कोणा एकासी ॥
हे शिकवण धरिता चित्ती । सकळ सुखे वोळंगती ।
अंगी बाणे महंती । अकस्मात ॥ १ ॥

अडले गांजले जाणावे । यथाशक्ति कामास यावे ।
मृदु वचन बोलत जावे । कोणा एकासी ॥
दुसऱ्याचे दुःखे दुःखी व्हावे । परसंतोषे सुखी व्हावे ।
प्राणीमात्रास मेळवून घ्यावे । बऱ्या शब्दे ॥

कठिण शब्दे वाईट वाटते । हे तो प्रत्ययास येते ।
तरी मग वाईट बोलावे ते । काय निमित्त ॥
पेरिले ते उगवते । बोलण्यासारखे उत्तर येते ।
तरी मग कर्कश बोलावे ते । काय निमित्त ॥ २ ॥

(१) दास्यत्व—गुलामगिरी, चाकरी. किंकर—नोकर. भाव—भक्ती. सबाह्य—आतबाहेर. नवनीत—लोणी. आपंगिता—आश्रय देणारा.

(२) नीच कृत्य—हलक्या दर्जाचे काम. क्रोध—राग. परपीडा—दुसऱ्यास त्रास, दुःख. विकल्प—शंका. वोळंगती—मिळतात. महंती—मोठेपण ( पुढारीपण ). प्रयत्न—अनुभव. अकस्मात—आपोआप. निमित्त—कारण. कर्कश—कठोर. यथाशक्ति—शक्तीप्रमाणे.

---

## ४३. कपाळावरील खोक

भगवंताचे वय आज दहा अकरा वर्षांचे होते. भगवंता स्वभावाने अत्यंत चलाख आणि अभ्यासात हुषार होता. गावात त्याचे मोठे घर होते आणि रानात खूप शेती होती. त्या गावात भगवंताचे घर अत्यंत सुखी आणि लोकांच्या उपयोगी पडणारे म्हणून कीर्ती होती.

भगवंताला भावंड मात्र कोणीच नव्हते. आईवडील लागेल तो खर्च करीत. त्यांनी मुलाला काही कमी पडू दिले नाही.

भगवंताच्या आईचे नाव जिजा. तिच्या कपाळावर एक भली मोठी खोकेची खूण शिल्लक राहिलेली दिसत होती.

भगवंता नेहमी विचारी, " आई, ही कसली ग खूण तुझ्या कपाळावर ? काय लागले तुला ? " आई थोडीशी हसे. कसे सांगावे असे तिला वाटे. पण ती म्हणे, " कशाला हवी तुला उगीच चौकशी ? सांगेन केव्हा तरी. " असे आज कित्येक दिवस चालले होते.

गावातील मुले गणेशोत्सवात दारूबंदीचे नाटक करणार होती. भगवंता आपल्या घरी दारुड्याची नक्कल बसवीत होता. इतक्यात त्याची आई जिजा घरात आली.

जिजाने आपल्या मुलाचे ते सोंग पाहून विचारले, " भगवंता, हे काय चालले

आहे ? शुद्धीवर आहेस का तू ? "

भगवंता झिंगण्याच्या आविर्भावातच म्हणाला, " तू—तू कोण मला विचारणार ? " आणि त्याला हसू आवरेना, पण त्याने ते दिसू दिले नाही.

जिजाला कसल्या तरी प्रसंगाची आठवण झाली. भगवंता आईच्या मांडीवर लोळू लागला. त्याचे दारूबाजासारखे हेल काढणे चालूच होते. जिजाने कळवळून विचारले, " भगवंता, आज झाले काय तुला ? "

भगवंता म्हणाला, " मी कोणाच्या देवाला सांगणार नाही. "

भगवंता मनात हसतच होता. जिजाने भगवंताकडे रागाने पाहिले. ती रागाची नजर भगवंताला सहन झाली नाही. तो लाडाने म्हणाला, " मग मला तू सांग ना तुझ्या कपाळावर कसली खूण आहे ती ? "



" ती दगडाची खोक आहे बाळ, आणि—"

" कोणी मारला तुला दगड ? सांग मला त्याचे नाव. आता बदडून काढतो त्याला. "

" मला आपल्या घरच्या माणसांनीच.... "

" कुणी ? बाबांनी ? " एकदम आश्चर्याने ताठ बसत भगवंता उद्गारला.

" होय बाळ. मग आता सगळे सांगतेच तुला, ऐक. तुझ्या वडिलांना दारूचे खूप व्यसन होते. संध्याकाळी ते दारू पिऊन तर्रर्र होऊन यायचे. मी काही बोलले तर मला मारायचे, शिवीगाळ करायचे. दारूपायी आपले घर, शेते—सारे सारे त्यांनी गहाण टाकले होते. दारूपुढे त्यांना काही सुचत नव्हते. आम्ही जवळ जवळ भिकेला लागलो होतो. "

" त्या वेळी तू एक वर्षाचा होतास. घरात धान्याचा कण नव्हता. वेळ अशीच संध्याकाळची होती. मी तुला कडेवर घेऊन काळजी करीत उभी होते. तोच ते

बाहेरून आले. झिंगतच आले आणि दारूकरिता माझ्याजवळ पैसे मागू लागले. माझ्याजवळ काहीच नव्हते. मी म्हटले, "माझ्याजवळ काय आहे ? एवढे सोनुले शिल्लक आहे..........." ते रागाने म्हणाले, "हां ! मग ते सोनुलेच वीक आणि पैसे आण. आण म्हणतो ना लवकर !"

"मीही रागाने काही तरी बोलले. त्यांचा राग अनावर झाला. 'माझ्यापेक्षा तुला सोनुले जास्त वाटते काय ?' असे काहीसे पुटपुटत ते रस्त्यावर गेले, तुला मारण्याकरिता एक दगड घेऊन आले आणि तो तुझ्या अंगावर भिरकावला. मी मध्ये आले........ती ही कपाळावरची खोक."

भगवंताचे डोळे डबडबले. आईने माझ्याकरिता स्वतःला जखम करून घेतली, असे विचार त्याच्या मनात येऊन त्याला वाईट वाटले. आईबद्दल अधिकच प्रेम वाटू लागले. बापाचा रागसुद्धा मनात आला.

पुन्हा आई म्हणाली, "बाळ, माझ्या कपाळावरची खोक पाहाताच तुझे वडील भानावर आले. त्यांनी शपथ घेतली नाही, पण त्या दिवसापासून त्यांनी दारू सोडली. त्यांनी मोलमजुरी केली, उद्योगधंदा केला आणि आपली शेतीवाडी, घर गहाण पडले होते ते सोडवले. आता आपले घर किती चांगले म्हणून सारे गाव वाखाणीत आहे. तुझ्या नशिबाने आपले दिवस पालटले. त्यांचा स्वभाव पालटला. दारूकरिता तुझ्यावर दगड उचलणारे आता तुला किती जीव लावतात !

"भगवंता, आज तुला दारुड्यासारखा बरळताना पाहून मला पूर्वीचे दिवस आठवले. सांग, तू आता असा का बरळत होतास ?"

"अग आई, गणपति-उत्सवातील करमणुकीच्या कार्यक्रमात आम्ही मुले दारूबंदीचे नाटक करणार आहोत. आता जिकडे तिकडे दारूबंदी झाली आहे ना ? लोकांना दारूचे वाईट परिणाम कळावे म्हणून नाटकातील दारुड्याची नक्कल मी पाठ म्हणत होतो."

या वेळेपर्यंत भगवंताचे वडील घरी आले होते. बैठकीच्या खोलीत ते उभे होते. त्यांनी हा संवाद ऐकला. ते आत आले व म्हणाले, "बाळ, तू ऐकलेस ना दारूचे परिणाम ? माझे दारूचे व्यसन सुटले नसते तर आज सर्वजण भीक मागत असतो किंवा उपाशी पोटी मरून तरी गेलो असतो."

आविर्भाव—हावभाव. उद्गारणे—बोलणे. सोनुले—लहान मूल.
अनावर होणे—न आवरणे.

## अभ्यास

१. भगवंता कोणाची नक्कल करीत होता ? त्यामुळे आईला का वाईट वाटले ? भगवंताला कशाचे हसू येत होते ?

२. जिजाच्या कपाळावर कशामुळे खोक पडली होती ?

३. भगवंताच्या वडिलांची दारू कशी सुटली ? त्याचा परिणाम काय झाला ?

४. गहाण टाकणे, भिकेला लागणे, दिवस पालटणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

---

# ४४. महावीर

ही शांत आणि भव्य मूर्ती पाहा ! चेहऱ्यावर राग नाही, लोभ नाही ; एक प्रकारची प्रसन्न शांतता आहे. हे बांधेसूद शरीर कसे डौलदार दिसते, नाही ? हाच भगवान महावीर; जैन धर्माचा संस्थापक.



आपल्या उत्तर भारताचा पूर्वेकडील प्रदेश फार सुपीक आहे. त्यातील एका भागाला पूर्वी विदेह म्हणत. या देशाची राजधानी वैशाली गंडकी नदीच्या तीरावर ती वसली होती. या राजधानी-जवळ राजा सिद्धार्थ राहात असे. सिद्धार्थ आणि त्याची राणी त्रिशला ही दोघे फार सज्जन म्हणून प्रसिद्ध होती. यांच्याच पोटी भगवान महावीर जन्मास आला.

महावीराचे पाळण्यातले नाव होते वर्धमान. त्याच्या जन्मापासून सिद्धार्थाचे वैभव वाढले, म्हणून राजाने त्यांचे हे नाव ठेवले. वर्धमान म्हणजे वाढणारा —वाढविणारा. त्याचा स्वभाव शांत व गंभीर असे.

तो आपल्या विचारांत नेहमी गढलेला असे. त्याचे शरीर चांगले पुष्ट आणि तेजस्वी होते. भीती त्याला माहीतच नव्हती. त्याच्या या स्वभावावरूनच त्याचे नाव

' महावीर ' पडले. महावीर म्हणजे मोठा शूर पुरुष.

महावीर विद्या लौकर शिकला. लहानपणापासूनच उंची कपडे, दागिने छानछोकीच्या वस्तू यांच्याकडे त्याचे लक्षच नसे. संसार करावा असे त्याला कधीच वाटले नाही. पण आईबापांची इच्छा म्हणून त्याने लग्न केले. त्याला एक मुलगीही झाली. पण त्याचे मन काही सुखी नव्हते. तो अठ्ठावीस वर्षांचा असताना त्याचे आईवडील वारले. मग मात्र त्याने निश्चय केला की आता संसारात गुंतून पडायचे नाही. मार्गशीर्ष महिना होता. शुक्ल पक्षातल्या दशमीच्या दिवशी महावीराने सर्वांचा निरोप घेतला. पालखीत बसून तो बाहेर पडला. हजारो लोक हळहळले. त्याच्यामागे रडत रडत जाऊ लागले. " वर्धमाना, परत फीर; आम्हांस सोडून जाऊ नको," असे विनवू लागले. पण वर्धमानाचा निश्चय ढळला नाही. त्याने हात जोडून सर्वांना परत जायला सांगितले.

पालखी शहराबाहेर आली. महावीर खाली उतरला. त्याने अंगावरची रेशमी वस्त्रे फेकून दिली; एकच वस्त्र त्याने अंगावर ठेवले आणि तपश्चर्या करण्यासाठी तो एकटा निघाला.

एकदा तो तपश्चर्येस बसला. अंगाला वारा, ऊन, पाऊस यांचा त्रास होऊ नये म्हणून भोवती गवत आणि पाने यांच्या चार भिंती त्याने बांधून घेतल्या. पण भुकेली जनावरे येत आणि त्या भिंतीतले गवत आणि पाने ओरबाडून खात. महावीराला हे दिसत होते, पण त्याने काही हालचाल केली नाही. काही वेळाने भिंती जाग्यावर राहिल्या नाहीत. महावीर तसाच बसला होता. असे त्याचे मन दयाळू होते.

एकदा तो एका गावी जाण्यास निघाला. संध्याकाळ झाली होती. गुरेवासरे रानातून येत होती. घरोघर चुली पेटल्या होत्या. गावानजीकच्या एका देवळात महावीर उतरला. येथेच रात्र घालवावी आणि दुसऱ्या दिवशी सकाळी पुढे निघावे असे त्याने ठरवले. इतक्यात काही गावकरी येऊन त्याला म्हणाले, " साधू महाराज, हे देऊळ रात्री राहायला योग्य नाही. रात्री येथे एक दुष्ट यक्ष येतो आणि तो देवळात कोणी माणूस असल्यास त्याला खाऊन टाकतो." वर्धमान हसून म्हणाला, " असू द्या, मी त्या यक्षाचा बंदोबस्त करीन." रात्री गावकऱ्यांनी लांबून ढोल आणि किंकाळ्या यांचे नाद ऐकले. " आला बरं का तो यक्ष, " सर्वजण म्हणाले. काही वेळाने मधुर संगीत ऐकू येऊ लागले. गावकरी म्हणाले, " खास

या यक्षाने या साधूला खाऊन टाकले असले पाहिजे, आणि आता त्या आनंदात यक्ष मधुर गाणी गात आहे." सकाळ झाल्यानंतर गावकरी मंदिरात गेले. महावीर ध्यानस्थ होता आणि त्याच्या पायांशी गंधफुले, नैवेद्य वगैरे पडली होती. हा कोणी तरी दिव्य पुरुष आहे अशी गावकऱ्यांची खात्री झाली.

महावीराची कीर्ती अशीच पसरत गेली. त्याच्या भोवती भक्तगण जमायला लागले. वैशाली, कौशांबी, मगध येथील राजांनी महावीराला गुरू केले. महावीराला धर्मज्ञान झाले.

एकदा महावीर मध्यमा नावाच्या नगरीस गेले. तेथे यज्ञासाठी अनेक विद्वान ब्राह्मण जमा झाले होते. महावीरांना वाटले, "आपल्या धर्माचा प्रचार करायला ही संधी बरी आहे." तेथे जमलेल्या त्या विद्वान ब्राह्मणांशी त्यांनी वाद घातला. यज्ञात पशुहत्या का करू नये आणि धर्माचा खरा मार्ग कोणता हे महावीरांनी सर्वांना पटवून दिले. सारे विद्वान महावीरांच्या उपदेशापुढे फिके पडले. त्यांतल्या पुष्कळांनी गुरू म्हणून त्याच्या पायांवर डोके ठेवले. या वेळी हजारो स्त्री-पुरुष महावीरांचे शिष्य बनले.

महावीरांची शिकवण फार थोर आहे आणि तितकीच सोपीही आहे. "देवाच्या घरी सर्व प्राणी सारखे आहेत म्हणून कोणी कोणाचा द्वेष करू नये," असे महावीर सांगत. खरे बोलावे आणि वागावे, शक्य तितक्या साधेपणाने राहावे; स्त्री-पुरुष, उच्च-नीच, असा माणसांत भेद करू नये, असा त्यांचा उपदेश असे. त्यांचा आपल्या भारताच्या इतिहासावर फार परिणाम झाला आहे.

महावीरांच्या शिष्यांना जैन म्हणतात. आपल्या देशात जैनांनी खूप देवळे, लेणी, इमारती बांधल्या आहेत. त्यावरचे नक्षीकाम फारच सुंदर आहे. व्यापार, साहित्य यांमध्ये सुद्धा जैनांनी मोठी कामगिरी केली. अशा रीतीने आपला देश त्यांनी श्रीमंत आणि सुंदर केला आहे.

महावीरांच्या वयाला बहात्तर वर्षे पूर्ण झाली. एके दिवशी त्यांनी आपल्या सर्व शिष्यगणांना बोलावले. सुमारे अठरा राज्यांतले लोक जमले होते. महावीर त्यांच्यापुढे सारखे बोलत होते. एखाद्या ढगातून पाऊस कोसळावा त्याप्रमाणे त्यांच्या मुखातून वाणी बाहेर पडत होती. धर्मासंबंधी अशा रीतीने सर्व सांगून झाल्यावर ते डोळे मिटून स्वस्थ बसले. याच वेळी या महापुरुषाचा स्वर्गवास झाला.

पुष्ट--पोसलेले. भक्तगण--भक्तांचा समुदाय. पशुहत्या--प्राणी मारणे. वाद घालणे--चर्चा करणे. स्वर्गवास होणे--मरण पावणे. ध्यानस्थ बसणे--समाधी लावून बसणे, चिंतन करणे.

## अभ्यास

१. महावीराचे मूळचे नाव काय? 'महावीर' हे नाव त्याला का पडले? तो कोठे जन्मला?
२. महावीराने तरुण वयात कोणता निश्चय केला? त्याला काय कारण घडले?
३. महावीराने तपश्चर्या कशी केली? 'हा कोणीतरी दिव्य पुरुष आहे,' अशी लोकांची खात्री कशी पटली?
४. महावीरांची शिकवण काय आहे? त्यांच्या शिष्यांना काय म्हणतात?
५. एखाद्या जैन मंदिरास भेट देऊन त्याचे वर्णन करा.

---

# ४५. प्राणज्योती

[ दिव्याची ज्योत आपल्याला उजेड देते. महात्मा गांधींचा प्राण ही पण एक ज्योतच आहे, असे कवीला वाटते. महात्मा गांधींच्या मरणानंतर कवीने त्यांचा मोठेपणा वर्णन करणारी ही कविता लिहिली आहे. ]

ती पहा ती पहा । बापुजींची प्राणज्योती
तारकांच्या सुमनमाला । देव त्यांना वाहताती. १

चंदनाचे खोड लाजे । हा झिजे त्याहूनही
आज कोटी लोचनींच्या । अश्रुमाला सांगताती. २

" सत्य मानी देव, आणि । झुंजला खोट्यासवे हा
ना करी तल्वार होती । हा अहिंसेचा पुजारी. ३

रंगला रंकांसवे हा । झुंजला राजांसवे हा
दोन हातांचा परंतू । देव याला मानिताती. ४



भारताच्या मुक्तिसाठी । भारताच्या शुद्धिसाठी
प्राणही लावी पणाला । भारताची हीच शक्ती." ५

— मनमोहन

सुमनमाला—फुलांचे हार. लोचन—डोळे. अश्रुमाला—आसवांची माळ. करी—हातात. अहिंसा—न मारणे, कोणाचेही मन न दुखविणे. रंकांसवे—गरिबांबरोबर. मुक्तीसाठी—स्वातंत्र्यासाठी. झुंजणे—लढणे.

———

# शब्दसंग्रह

अघोर
अचपळ
अचंबा
अदृश्य
अधम
अनर्थ
अभ्रा
अभिप्राय
अभिवादन
अवखळ
अवदसा
अवाढव्य
असहकारिता
अहिंसा
अहोरात्र
आख्यायिका
आगळे
आघात
आचार्य
आर्जव
आपंगिता
आरूढ
आलिंगन

आविर्भाव
उत्तान
उद्घाटन
उन्माद
उपसेना
उसंत
ओवरी
अंबुज
कर्णिका
कलगी
कसा
कानोसा
कामिनी
कावणे
कासार
किंकर
कुभांड
कूजन
कृतघ्न
खलाशी
खंदक
गहिरा
गहिवर

गव्हर्नर
गोदी
गोषा
चक्रपाणी
चिलखत
छावणी
जागल्या
झांजर
झिंजाटणे
टेलिफोन
डिरी
तपश्चर्या
तलम
तीर्थयात्रा
तुरग
तोक
दानव
द्वारपाल
दुपेटा
दुर्बीण
दुहिता
दैत्य
धरणी

ध्वनिक्षेपक
नजरकैद
नजराणा
नर्तन
नवनीत
निधडी
निमिष
निर्झर
निर्वाह
निःशस्त्र
नेता
नोकदार
पडघम
पतपेढी
पथक
परिवार
परेड
पल्लव
पांजणी
पायजमा
पारावार
पुढा
पोशिंदा

प्रत्यय
प्रमोद
प्रशंसा
प्रसंगावधान
प्राचीन
प्रेक्षणीय
प्लॅटफॉर्म
फुलराणी
बल्लव
बहिष्कार
बिगूल
बिजली
बेगमी
भाट
भूतदया
भ्रूतट
भ्रष्टाकार
मर्कट
मद्य
महर्षी
मर्मस्थान

मांडलीक
म्युझिअम
मेघनीळ
मोहिनी
मोहीम
यक्ष
यारी
रखवाली
रणगाडा
राजीनामा
रावा
रेडियो
रंक
लढवय्या
लतिका
लोचन
लोण
वडिलोपार्जित
वनराज
वरमणे
वळचण

वल्कल
वारी
वारू
वाळीत
विकल्प
विद्यापीठ
विद्युत
विनय
विद्रूप
विरोध
विलक्षण
विस्मय
विहग
विज्ञापना
वेदना
वोळंगणे
व्यासपीठ
व्रात्यपणा
शरमिंदा
शव
शिरसाष्टांग

शोकाकुल
सत्याग्रह
सत्यानाश
समशेर
सहानुभूती
साम्राज्य
साक्षात्कार
सांगाती
सुगावा
सौभाग्यवती
संकल्प
संग्राम
संन्यास
स्कॉलरशिप
स्तंभित
स्वयंसेवक
हन्त
हिंदोळा
हुजऱ्या

